# नवभारत

वर्ष ७ वें ] जून १९५४ [ अंक ९ वा



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सातवें
अंक नववा

# नवभारत

जून
१९५४

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख
प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )






# 'नवभारत' मासिक, जून १९५४

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षीं या पूर्वीं त्यांचे लेख आले त्या त्या वेळीं दिला आहे. -- का. सं. ]

**श्री. ना. गो. चापेकर** ( बदलापूर ) – प्रसिद्ध विचारवंत साहित्यिक आणि समाजशास्त्रज्ञ. 'आमचा गांव', 'समाजनियंत्रण', 'वैदिक निबंध' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**डॉ. शं. दा. पेंडसे** एम्. ए. पीएच्. डी – नागपूर विद्यापीठांतील मराठीचे प्राध्यापक. 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास', 'शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**प्रा. श्री. ना. बनहट्टी** – नागपूर विद्यापीठांतील मराठीचे माजी प्राध्यापक. हल्लीं पुणें नभोवाणीचे मराठी विभागाचे सल्लागार.

**श्री. कृ. के. कोल्हटकर** – ( सातारा ) 'सार्थ सविवरण पातंजल योगदर्शन' या पुस्तकाचे कर्ते.

**डॉ. मा. स. केळकर** ( अकोला ) – निसर्गोपचारपद्धतीचे व्यासंगी तज्ज्ञ. 'आहार' या मासिकांत यांची आरोग्यविषयक लेखमाला येत असतात.

**श्री. चिं. ग. काशीकर** एम्. ए. ( टिळक ) – वैदिक संशोधनमंडळाच्या सायणभाष्यसहित ऋग्वेदाचे एक संपादक. 'ऋग्वेदकालीन सांस्कृतिक इतिहास', 'Indian Medicine' ( प्रो. यॉलीच्या जर्मन ग्रंथाचें भाषांतर ), 'आयुर्वेदीय-पदार्थविज्ञानम्' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**प्रा. वि. म. दांडेकर** – पुणें येथील 'गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलिटिक्स ॲन्ड एकानॉमिक्स' या संस्थेंत व पुणें विद्यापीठांत 'स्टॅटिस्टिक्स्'चे प्राध्यापक.

**श्री. गं. रा. पटवर्धन** एम्. ए. आय्. ए. एस्. – सध्या कलकत्ता येथें इन्कमटॅक्स–खात्यांतील एक अधिकारी.

**प्रा. ग. ना. जोशी** – नवसारी येथील गार्दा कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

**श्री. गणेश गोपाळ पाठक** बी. ए. एल्एल्. बी. ( नागपूर ) – मध्यप्रदेश राज्यांतील भाषाविभागांत प्रमुख मराठी अनुवादक.

**प्रा. अ. रा. केळकर** – पुणें येथील 'बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कामर्स'मध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

## शुद्धिपत्र

गेल्या मे अंकांतील **श्री. शं. बा. जोशी** यांच्या लेखांत

पान २ वर ( पहिला स्तंभ, वरून सहावी ओळ ) 'पाऊ'च्या ऐवजीं '**पाड**' वाचावें.
पान ३ वर ( दुसरा स्तंभ, वरून २२–२३ ओळ ) 'पेमीनडिगल्' ऐवजीं '**पेर्मानडिगल्**' वाचावें.
पान ५ वर ( दुसरा स्तंभ, वरून २३ व २७ वी ओळ ) 'बारुदेव'च्या ऐवजीं '**बाइदेव**' वाचावें.
पान ६ वर ( पहिला स्तंभ, वरून २० वी ओळ ) 'स्नाकरी' ऐवजीं '**स्नान करा**' वाचावें.

गेल्या मे अंकांतील **श्री. वा. गो. देसाई** यांच्या लेखांत

पान १८ वर ( पहिला स्तंभ, वरून १० वी ओळ ) 'सूक्ष्म' ऐवजीं '**शुभ**' वाचावें.
पान १८ वर ( तळटीपेंत वरून ३ री ओळ ) 'कोस्वोल' ऐवजीं '**फोस्बोल**' वाचावें.

एक चर्चा

# जगांतील दुष्टपणा व अन्याय आणि ईश्वरवादी विचारसरणी

[ जन्मभर देवाशीं वैर करून शेवटीं केवळ देवाच्या हातून मरण आलें एवढ्याच कारणामुळें दुष्ट माणूस सद्गतीला जाऊं शकतो, हें दाखविणाऱ्या अनेक कथा पुराणांतून सांपडतात. मिरजेचे श्री. वि. ज. सहस्रबुद्धे यांनीं श्रीकृष्णचरित्रांतील अशा कथांचा उल्लेख करून, नीतीच्या व तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें अशा कथांची कांहीं सुसंगत उपपत्ति लागणें शक्य आहे काय अशी शंका उपस्थित केली आहे. ही त्यांची शंका त्यांनीं महाराष्ट्रांतील कांहीं विद्वान् विचारवन्तांपुढें पत्रव्यवहारांत मांडून त्यांना आपल्या शंकेचा खुलासा करण्यांस विनंति केली. कांहीं विचारवंतांकडून त्यांना उत्तरें आलीं. श्री. सहस्रबुद्धे यांची शंका आणि त्यांना विचारवंतांकडून आलेलीं उत्तरें हीं मोठीं उद्बोधक आहेत. ही शंका व उत्तरें पुराणांतील कथांच्या निमित्तानें निघालीं असलीं तरी त्यांतून निघणारे प्रश्न व्यापक स्वरूपाचे व विचारप्रवर्तक आहेत. या दृष्टीनें प्रस्तुत पत्रव्यवहारच येथें प्रसिद्ध केला आहे. हा पत्रव्यवहार श्री. सहस्रबुद्धे यांनीं गेल्या ( १९५३ ) वर्षाच्या उत्तरार्धांत केला. प्रस्तुत पत्रव्यवहार ' नवभारतां'त प्रसिद्धीकरितां दिल्याबद्दल श्री. सहस्रबुद्धे यांचे आभार. — का. सं. ]

## मूळ शंका

श्रीकृष्णचरित्रांतील माझी शंका आहे. पूतना ही कृष्णास दुग्धपान देण्याचें निमित्त करून त्याला मारण्यास आली होती. पण तो डाव तिच्यावरच उलटला. कृष्णानें तिला यमसदनास पाठविली हें खरें. परंतु ती पुढें सद्गतीला गेली असें भागवतांत म्हटलें आहे. दुसरें, अनेक असुर अथवा दैत्य कृष्णानें मारले परंतु तेहि सद्गतीलाच गेले असें सांगण्यांत येतें. पूतना, कंस इत्यादींची ही एक विरोधी भक्तीच होय असेंहि समर्थन केलें जातें. परंतु वेदान्तविचार-सरणीनें पाहतां अगर तत्त्वज्ञानाचा विचार केला तर अशा दुष्ट लोकांस सद्गति मिळणें शक्य नाहीं व इष्टहि वाटत नाहीं. कर्मविपाकप्रक्रिया मानली तर दुष्ट लोक दुर्गतीलाच गेले पाहिजेत. तेव्हां भागवत इत्यादि पुराणांमध्यें वरील प्रकारच्या कथा वर्णिल्या आहेत त्या अर्थवादपर किंवा पोकळच समजल्या पाहिजेत. जन्मभर देवाशीं वैर करून मग केवळ देवाच्या हातून मरण आलें एवढ्याच कारणामुळें तो दुष्ट मनुष्य सद्गतीला जाऊं शकतो ही गोष्ट शक्य कशी समजावी ? अशानें दुष्टांच्या दुष्ट कृत्यास आळा बसेल अगर आळा बसतो असें तरी कसें म्हणतां येईल ? तेव्हां या बाबतींत वस्तुस्थिति काय असावी व तत्त्वज्ञान दृष्टीनें अशा कथांची संगति कशी लावावी या प्रश्नांचा खुलासा आपल्याकडून कळला तर आभारी होईन.

— वि. ज. सहस्रबुद्धे, मिरज

## कर्मविपाकसिद्धान्ताचा पगडा

आपण उपस्थित केलेल्या प्रश्नासंबंधीं माझे विचार मी आपणांस थोडक्यांत कळवीत आहे :

(१) सृष्टीची उत्पत्ति, स्थिति आणि लय करणारा एक परमेश्वर आहे, असा विश्वास धारण करून विश्वांतील घडामोडींचा विचार करूं लागलें असतां विश्वांत अन्याय आणि दुष्टपणा यांची उत्पत्ति कशी झाली असेल व ती होऊं देण्यांत ईश्वराचा कोणता हेतु असेल अशा शंका मनांत उद्भवतात. या शंकांचें समाधान करीत असतांना







असा एक विचार निघाला कीं जगामध्यें चांगलें व वाईट हीं दोन्ही असल्यावांचून चांगल्याचें महत्त्व सुद्धां बरोबर दाखवून देतां येणार नाहीं. म्हणून सत् आणि असत् या दोहोंचीहि उत्पत्ति ईश्वरानें केली असून मनुष्यानें सताचें अनुकरण करावें आणि असताचें अनुकरण करूं नये असाच बोध मनुष्यांनीं घ्यावा हा ईश्वराचा हेतु आहे. जगांत देव आणि असुर यांचा नित्य झगडा चालू आहे, हें एक ईश्वरानें चालविलेलें नाटक आहे व त्या नाटकापासून वरील बोध आपणांस व्हावा असा त्याचा हेतु आहे. ज्याप्रमाणें नाटकांत एक नायक व एक खलनायक असतो, त्याचप्रमाणें जेव्हां एखादा अवतारी पुरुष जन्मास येतो तेव्हां त्याचा प्रभाव दाखविण्यास अवश्य असणारा एक अत्यंत प्रबल असा खलपुरुष जन्मास आलेला असून तो सर्वसामान्य देवांचा म्हणजे सज्जनांचा पाडाव करीत असतो. सर्वसामान्य सज्जन त्याचा पाडाव करूं शकत नाहींत, तेव्हां ईश्वर अवतार घेवून त्याचा पाडाव करतो आणि सज्जनांचा पक्ष वरचढ बनतो. जर त्या असामान्य खलपुरुषाचा प्रभाव पडलाच नसता तर ईश्वराला अवतार घेण्याचें कार्यहि करावें लागलें नसतें. या दृष्टीनें विचार करतां रावण हा रामाच्या अवताराची पूर्वतयारी करतो अथवा कंस कृष्णाच्या अवताराची पूर्वतयारी करतो असें म्हणतां येतें. या दृष्टीनें सृष्टीच्या विकासाचें कार्य करण्यांत दुष्ट पुरुष हे सुद्धां अप्रत्यक्षपणें साहाय्य करीत असतात व म्हणून त्यांच्या निर्मितींतहि परमेश्वराचा चांगलाच हेतु आहे असें ईश्वरवादी व भगवद्भक्त म्हणत असतात. अवतारी पुरुषाच्या रूपानें प्रकट होणारा सगुण ईश्वर हा सद्गुणी असला तरी निर्गुण आणि अव्यक्त असें जें ईश-तत्त्व किंवा परब्रह्म तें सत् आणि असत् या दोहोंच्या रूपानें प्रकट होणारें आणि या दोहोंच्या अतीत असणारें एक अव्यक्त, अनिर्वचनीय असेंच तत्त्व आहे. हें वेदान्ताचें तत्त्व हिंदु धर्मांतील भगवद्भक्तांनीं मान्य केलेलें आहे. पण या सिद्धान्ताला मान्यता देणें हा एक नास्तिकवाद आहे असें खिस्ती व महंमदी धर्माचे अनुयायी समजतात.

( २ ) जगांतील घडामोडी हें एक नाटक आहे असें म्हटलें तरी त्यांतील नायक व खलनायक यांच्या जीवनांत कर्मविपाकाचें तत्त्व प्रभावी असल्याचें सिद्ध करावें लागतें. त्यासाठीं पूर्वजन्माचा व पूर्वजन्मांतील घटनांचा आधार घेऊन ईश्वराला अवतार घ्यावा लागणें व सामान्य मानवाप्रमाणें सुखदुःखांचे भोग घ्यावें लागणें हाहि कर्मविपाकाचाच परिणाम होय असें दाखवून देणाऱ्या कथा भक्तिमार्गीयांनीं रचलेल्या आहेत. उदाहरणार्थ, तुलसीदास-रामायणांत असें दाखवून देण्यांत आलें आहे कीं, विष्णूनें नारदाची चेष्टा करून त्याचें तोंड माकडासारखें बनविलें व त्याचें लोकांत हंसें केलें. यामुळें नारदानें विष्णूला शाप दिला कीं, तुला मनुष्य-जन्मास येऊन पत्नीविरह सहन करावा लागेल आणि माकडांचें साहाय्य घ्यावें लागेल. या शापाचा परिणाम झाल्यामुळेंच विष्णूला रामाचा अवतार घ्यावा लागला, पत्नीविरह सहन करावा लागला आणि माकडांचें साहाय्य घेऊन रावणावर विजय मिळवावा लागला तुळसीदासानें असेंहि दाखविलें आहे कीं, रावण आणि कुंभकर्ण हे पूर्वजन्मीं शंकराचे गण ( भक्त ) होते. दुसऱ्या एका कथेंत ते विष्णूचे भक्त होते असेंहि सांगितलें आहे. या विष्णूच्या ( जय-विजय ) भक्तांनीं कांहीं अपराध केल्यामुळें त्यांना प्रथम हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपु या रूपानें व पुन्हां रावण व कुंभकर्ण या रूपानें असुरांचा व राक्षसांचा जन्म घ्यावा लागला. त्यांना ही शिक्षा ज्या शापानें दिली त्याचाच उःशाप असा होता कीं, या जन्मांत विष्णूच्या अवताराकडून त्यांना मृत्यु प्राप्त होईल आणि अशा रीतीनें त्यांनीं आपल्या अपराधाबद्दल पूर्ण शिक्षा भोगल्यानंतर त्यांना पूर्वींची भगवद्भक्ताची स्थिति प्राप्त होईल. म्हणजे ज्यांना विरोधी भक्त असें मानण्यांत आलें आहे ते असुर किंवा राक्षस पूर्वी भगवद्भक्तच होते व त्यांच्या पापाचें फळ भोगून झाल्यानंतर ते पुन्हा भगवद्भक्तच बनतील. अशा रीतीनें कर्मविपाकाचा सिद्धान्त ईश्वरी अवतार व त्यांचे विरोधक म्हणजे संसारनाटकांतील नायक व खलनायक या दोहोंच्याहि जीवनास व मरणास लावून दाखविला आहे. संसारांतील सर्व घडामोडी ईश्वरी इच्छेनें होतात व त्यांतील चांगल्या व वाईट अशा दोन्हींहि प्रकारच्या घटनांमागें ईश्वराचा चांगलाच हेतु आहे हें सिद्ध करण्यासाठीं आणि सर्व घटनांना नैतिक कर्मविपाकाचा सिद्धान्त लावून दाखविण्यासाठीं वरील प्रकारच्या कथांचा आश्रय करण्यांत








आला आहे. अर्थात् संसारांतील घटनांकडे पाहण्याचें एक विशिष्ट तत्त्वज्ञान आणि ईश्वराची न्यायनिष्ठा यांची सिद्धि करण्याचा हा एक प्रयत्न आहे. पण हा दृष्टि-कोण अथवा ही विचारसरणी आधुनिक बुद्धीला पटण्यासारखी वाटत नाहीं. निदान मला तरी ती पटत नाहीं.

( ३ ) मी स्वतः आत्मसाक्षात्कार, स्थितप्रज्ञावस्था निर्वाणप्राप्ति हीं ध्येयें मान्य करणारा आहे व त्यामुळेंच मी स्वतःस अध्यात्मवादी समजतों तरीहि पूर्वजन्म व पुनर्जन्म या सिद्धान्ताचा आश्रय करून जगांतील अन्यायांचा व अनिष्टांचा उलगडा करून दाखविणारी ईश्वरवादी विचारसरणी मला पटत नाहीं. त्यापेक्षां गौतम बुद्धाचा अज्ञेयवाद किंवा महावीराचा निरीश्वरवाद हीं तत्त्वें मला अधिक सयुक्तिक वाटतात. बुद्धाचा अज्ञेयवाद किंवा शून्यवाद यासारखेंच कांहींसें श्रीशंकराचार्यांच्या वेदान्तांतील निर्गुण अव्यक्त तत्त्व आहे तेंहि मान्य करण्यासारखें आहे. पण जगांतील न्याय-अन्यायाच्या झगड्यांत परमेश्वरी हेतूचें संशोधन करून परमेश्वराचें सर्वशक्तिमत्त्व व त्याचबरोबर त्याची न्यायनिष्ठा, दयार्द्रता सिद्ध करून दाखविणारी भक्तिमार्गी विचारसरणी मला पटत नाहीं.

( ४ ) अर्थात् अवतारवाद आणि त्या अवतार-कार्याला विरोध करणारे विरोधी भक्त या दोनहि कल्पना आपणांस सोडून द्याव्या लागणार आहेत असेंच माझें स्वतःचें मत आहे सामान्य सज्जनांना जेव्हां आपला उद्धार अथवा आपलें रक्षण करितां येत नाहीं तेव्हां पुष्कळ वेळां असामान्य विभूति निर्माण होऊन हीं कार्यें करून दाखवितात. अशा असामान्य विभूतींना परमेश्वराचे अवतार समजणें व त्यांच्या विरोधकांना ईश्वराचे विरोधी भक्त मानणें, यापासून समाजाचें हित होण्यापेक्षां अनहितच अधिक होईल. अशा रीतीनें विचार करूं लागल्यामुळें आमच्या समाजरचनेंतील सर्व अन्याय व सर्व विषमता यांचेंहि समर्थन पूर्व-जन्मांतील पापपुण्यांचा काल्पनिक आधार घेऊन आम्हीं करूं लागलों. यामुळें स्त्रिया, शूद्र आणि अति-शूद्र यांच्यावरील अन्याय आम्ही समर्थनीय किंबहुना न्याय्य आहेत असेंच ठरविलें. आतां तरी ही विचार-सरणी सोडली पाहिजे असें मला वाटतें.

— शं. द. जावडेकर, इस्लामपूर

## कांहीं उपपत्ती

पुराणांतील देवकथांचें सुसंगत अभिप्राय निघता-तच, असें मानण्याचें कारण नाहीं. देवाची लीला अगाध आहे ही भावना सर्वांत प्रधान असते सुसंगत अभि-प्रायाच्याहि कथा असतात, नाहीं असें नाहीं. अनिर्बंध कल्पनांना कथाकार स्ववासनांच्या अनुरूप आकार देतो व कथा अस्तित्वांत येते. कथारचनांची संगति कथा-रचनाकाराच्या वासनांशीं असते. क्रूर कथाकार देवा-सहि क्रूर बनवितो. निदान क्रौर्याचें समर्थन अप्रत्यक्ष-पणें करण्याचा हेतु त्याच्या कथेंत असतो. स्वैराचारी, लहरी, व्यभिचारी व दुर्व्यवहारी देव आपल्या भक्तांचेंच प्रतिबिंब बनतात. प्रमाद, गुन्हे, अत्याचार कदापि टळणार नाहींत, ते चालूच रहावयाचे अशी भावना अज्ञातपणें व ज्ञातपणें ज्यांच्या मनांत असते ते दुष्टकथालेखक ईश्वरासहि तशा दुष्टांचा संहार करावयास लावून उद्धार करण्यास भाग पाडतात. कारण, त्यांना स्वतःला दुष्टावा ठेवून मुक्त व्हावयाचें असतें.

दुसरा अभिप्राय अधिक तात्त्विक निघतो तो असाः देवाशीं सामना करण्याचें सामर्थ्य असलेल्या दुष्टांच्या वा खलांच्या ठिकाणीं अनेक महान् दैवी गुण असतात, ते जवळजवळ देवच असतात. त्यांचें खलत्व एका मर्यादित विषयापुरतेंच असतें. त्याबद्दल शासन वा दण्डन झालें कीं, शिल्लक दैवी गुण राहतात; त्यांचें फल उद्धार !

तिसरी उपपत्ति अशी : ईश्वराचें ज्ञान हें मोक्षप्रद असा सिद्धान्त मानला म्हणजे त्याचें अपरिहार्य तर्कशुद्ध सार्वत्रिक समर्थन करणें भाग पडतें. देवाशीं सामना करणाऱ्या दुष्टास देवाचा साक्षात्कार होत असतो, एवढेंच नव्हे तर त्यास देवाचा निरंतर ध्यासच असतो. दुष्टाला, मरण हें फळ त्याच्या दुष्टकर्मानें मिळाल्यावर, शिल्लक पुण्य म्हणजे ज्ञान हेंच राहतें. त्यानें तो मुक्त होतो. त्याच्या पूर्वजन्मींच्या सत्कर्मामुळेंच ईश्वराचा साक्षात्कार होतो. ईश्वराच्या हातून मरण येणें हें पूर्व सुकृताचेंच फल. म्हणून सत्कर्माचा नियम येथें अभंगच राहतो.

अशा अनेक उपपत्ती आणखी सांगतां येतील.

— लक्ष्मणशास्त्री जोशी, वाई








## एक भावनात्मक प्रयत्न

आपण विचारलेल्या शंकेचें उत्तर समाधानकारक नाहींच. अद्वैत तत्त्व आणि ईश्वरदर्शनानें मोक्ष या दोन विचारांमुळें अशा कथा वर्णिल्या आहेत. त्यांत अर्थवाद बराच आहे यांत शंका नाहीं.

दुष्ट हिंसेची अपरिहार्यता आणि परमेश्वराचें प्रेममयत्व यांची सांगड घालण्याचा तो एक भावनात्मक प्रयत्न आहे.

— स. ज. भागवत, गारगोटी

## हे सर्व अर्थवाद

आपण समजतां तेंच बरोबर आहे. कर्मसिद्धान्त मान्य केल्यावर पूतनादि गोष्टींवर भरंवसा ठेवतां येत नाहीं. दुष्ट दैत्य-राक्षस केवळ कृष्ण-राम ह्यांच्या हातून मरण आलें म्हणून सद्गतीला प्राप्त होणार नाहींत, हें निश्चित. हे सर्व अर्थवाद होत. अर्धा टक्का सत्यांश, ९९॥ टक्के अतिशयोक्ति. पुराणांतील वचनें स्वतःच्या बुद्धीवर प्रत्येकानें तावूनसुलाखून घ्यावीं लागतात. मुख्य ठाम सिद्धान्तांना अनुसरून बाकीच्या उपकथांचा अर्थ लावावयाचा असतो.

— ना. गो. चापेकर, बदलापूर

## कर्मतत्त्व हें प्रकृतीचें तत्त्व

आपल्याला जो प्रश्न पडला आहे तो असा आहे कीं, आधुनिक विचारांत वाढलेल्या कोणालाहि तो पडावाच. पण आपण जुन्या वाङ्मयाकडे तसें बारकाईनें पहातच नाहीं, म्हणून प्रश्नहि पडत नाहींत.

दुष्टांना मिळालेली सद्गति हा मला तरी अर्थवाद वाटत नाहीं. उलट, कर्मवादाच्या सिद्धान्तानुसार ह्या सद्गतीचा अर्थ नीट लागतो. आधुनिक दृष्टीनें पाहिलें तर सुष्टपणा व दुष्टपणा यांचा संबंध दोन हत्तींच्या टक्करीसारखा नुसता द्वैताचा आहे. पण या द्वैतसंबंधाच्या पलीकडे जाऊन, सर्वच मानवी व्यापारांना एका सूत्रांत गोंवणारें कर्मतत्त्व आणि आधुनिक पापपुण्यविचार यांतील फरक या सद्गतीच्या कथांमुळें स्पष्ट होतो. कर्मतत्त्वाप्रमाणें पाहिलें, तर पाप व पुण्य या दोन्ही प्रकारच्या कृत्यांना प्रेरणा देणारी ' प्रकृति ' ही कर्त्याला ' बलात् एव ' खेंचून नेते. कर्ता निमित्तमात्र ठरतो. तो जें फल भोगतो तें स्वयंप्रेरित कर्माचें फल नसून प्रकृतीनें त्याच्या हातून घडविलेल्या कर्माचें फल असतें. उलट, आधुनिक विचाराप्रमाणें, पापपुण्याची प्रेरणा कर्त्याच्या ठिकाणींच पूर्णतया असल्यानें फलाचा भोग हा त्याला बरावाईट असा निश्चित मोबदल्यासारखा भोगावा लागतो.

आतां, मोबदल्याची ही आधुनिक व्यक्तिवादी कल्पना पूर्णपणें सोडून जुन्या कर्मवादाप्रमाणें पूतना, कंस, रावण, दुर्योधन वगैरे दुष्टांच्या कृत्यांचा विचार केला तर असें दिसतें कीं या सर्वांचीं दुष्ट कृत्यें व त्यांतून त्यांना लाभलेलें मरण यांत एक प्रकारची पूर्ति आहे. रामकृष्णादि अवतारांच्या पूर्तीसाठींच यांचेहि अवतारच आहेत. अवतारकार्य संपताच दुष्टांच्या दुष्टपणालाहि मग ' जीवित ' रहात नाहीं. व पूतना ही मग राक्षसी उरत नाहीं.

या सर्व प्रक्रियेंत एक प्रकारच्या द्वंद्वाचा—म्हणजे परस्पराश्रयी घटकांचा—विचार प्रधान आहे. द्वैत नव्हे तर द्वंद्व घेऊनच पापपुण्याचा विचार कर्मतत्त्वाशीं सुसंगत आहे. कारण, कर्मतत्त्व हें मूलतः नीतितत्त्व नाहीं. उलट, कर्मतत्त्व हें प्रकृतीचें तत्त्व आहे व तें पापपुण्याच्या पलीकडचें आहे.

या ठिकाणीं मला एक दाखला द्यावासा वाटतो तो असा :

वाघाला आपण दुष्ट म्हणतों आणि क्रूर म्हणतों. पण वस्तुतः वाघ तसा नसतो. तो अगदीं सहज 'अन्तःकरणप्रवृत्तीला ' जागून सावजावर झडप टाकतो व त्याचा फडशा पाडतो. आणि सावज ? तेंहि या सहज निसर्गक्रमानेंच भक्ष्य बनतें. निसर्गक्रम हा सुष्टदुष्टत्वाच्या पलीकडचा ( किंवा अलीकडचा ! ) आहे. वाघ आणि सावज यांचा प्रकृतिधर्म व अवतारकार्य वाघानें सावजाला खाऊन टाकण्यांतच पुरा होतो. या निसर्गक्रमालाच आपण कर्मतत्त्व ( किंवा प्रकृतिधर्म ) मानतों असें नव्हे. पण दोहोंत साम्य आहे, पापपुण्याच्या आधुनिक विचारापेक्षां वेगळेपणा आहे. त्या दृष्टीनेंच हें साम्य घ्यावयाचें.

सारांश, बालकृष्ण-पूतना, कृष्ण-कंस, राम-रावण, भीम-सुयोधन या द्वंद्वांना पूर्तता आल्यानंतर दोन्ही ( सुष्ट-दुष्ट ) अवतारांचें एका अर्थानें विलीनीकरण ( एका कर्मप्रवाहांत ) झालेलें आपण या सर्व भारतीय कथांतून वाचतों. यांत अर्थवाद नसून कर्मवादाची सार्थताच नाहीं का ?

— दि. के बेडेकर, पुणें








## 'न मे भक्तः प्रणश्यति'

भीतीनें, प्रेमानें किंवा वैरानेंहि ईश्वराचें अखंड स्मरण झालें तर फलप्राप्ति सारखीच. म्हणजे ज्याचें ध्यान झालें असेल, त्याची प्राप्ति होते. याला डंख मारणाऱ्या माशीच्या स्वरूपाची प्राप्ति किडीला होते असा दृष्टान्त देतात. ईश्वराच्या अखंड स्मरणाचें किंवा ध्यानाचें– मग तें कोणत्याहि कारणानें घडलेलें असो– महत्त्व यांत प्रतिपादन केलें असलें तरी तर्कदृष्ट्या यांत विसंगति नाहीं. वेदान्तांत ब्रह्मज्ञानामुळें संचित व क्रियमाण कर्मांचा नाश होत असल्यामुळें पुनर्जन्म प्राप्त न होतां मुक्ति मिळते, असा सिद्धान्त आहे. भक्तियोगांत सगुण परमेश्वराच्या प्रातीनेंहि पूर्व कर्मांचा नाश होत असल्यामुळें दुर्गतीचा प्रश्न शिल्लक उरत नाहीं. "सुदुराचार लोकहि भक्तीनें तरतात", "न मे भक्तः प्रणश्यति" असे भक्तियोगाचे सिद्धान्त आहेत. वेदान्तविचारसरणीशीं याचा विरोध नाहीं. मनुष्य आधीं सुष्ट असो वा दुष्ट असो, पण कोणत्याहि मिषानें किंवा कारणानें त्याला ब्रह्मज्ञान झालें किंवा भक्तियोगाप्रमाणें ईश्वरप्राप्ति झाली तर त्याची सर्व चांगलीं व वाईट कर्मेंहि जळून जातात व स्वर्ग किंवा नरकहि न मिळतां निर्गुण किंवा सगुण स्वरूपांत तो विलीन होतो. गीतेच्या अ. ९ श्लोक ३१।३२ वरील ज्ञानेश्वरी-टीका पहावी.

— शं. दा. पेंडसे, नागपूर

## श्रद्धेचा विषय

विरोधी भक्तीच्या परिणामासंबंधानें आपणांस जो प्रश्न पडलेला आहे तो मलाहि सुटलेला नाहीं. माझे त्या संबंधींचे कांहीं विचार आहेत, पण ते मांडावयाचे तर तो एक मोठा प्रबंध होईल. त्यासाठीं कांहीं अपेक्षित आधार शोधून मला त्याचें अवलोकन करावें लागेल. आपल्या भक्तिमार्गी तत्त्वप्रणालींतली ही एक महत्त्वाची बाब आहे. पौराणिक ग्रंथांत पूर्वजन्मांच्या कथांच्या आधारावर हा प्रश्न सोडविला जातो असें मला वाटतें. तें खरें मानायचें तर त्यावर श्रद्धा असली पाहिजे. एकूण हा श्रद्धेचा विषय आहे. तो तर्काच्या आधारानें कसा सोडविणार ? दुष्टांच्या दुष्ट कृत्यांना शिक्षा न मिळतां उलट त्याबद्दल त्यांना बक्षिसी मिळत असेल तर समाजाच्या नीतिमत्तेच्या कल्पनेला तें बाधक होईल हा आक्षेप खरा आहे. व तो पूर्वी अनेकांनीं घेतला आहे.

— श्री. ना. बनहट्टी, नागपूर

## 'वासनाप्रक्षयो मोक्षः'

(१) ज्या शास्त्रानें "वासनाप्रक्षयो मोक्षः" असें सांगितलें, तीं शास्त्रें "अन्तकाले च मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम् । यः प्रयाति स मद्भावम् याति नास्त्यत्र संशयः" ॥ असें सांगतात. अन्तकालीं ईशस्मरण झाल्यानें ईश्वरी प्रभावानें पूतनेचा वासनाक्षय झाला असें शास्त्रानुसार मानण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं.

(२) परमेश्वराच्या हातून मृत्यु येणारे जीव पूर्वजन्मींचे कोणी पुण्यात्मे असून कांहीं पापकर्माच्या प्रतिबंधामुळें त्यांना अशुभ जन्म प्राप्त झालेला असतो. भोगानें पापक्षय होऊन अंतिम ईश-स्मरण घडल्यानें त्यांना सद्गति प्राप्त होते असें वाटतें.

(३) मुक्ति चार प्रकारची आहे हें आपल्यास ठाऊक आहेचः समीपता, सलोकता, सरूपता, सायुज्यता. पूतनेसारख्यांना त्यांच्या त्यांच्या पुण्यबलानुसार पहिल्या तिहींतली कोणती तरी मुक्ति प्राप्त होते. तेथें योग्य क्रमांत त्यांच्या वासनांचा नाश होऊन मग सायुज्यमोक्ष प्राप्त होतो.

ज्यांचा वासनाक्षय याच जन्मांत होतो त्यांना सायुज्यता देहपातानंतर लागलीच मिळते. ह्या तिहींपैकीं कोणतीतरी उपपत्ति पूतनेसारख्यांना लागू पडेल असें वाटतें.

— कृ. के. (बाबा) कोल्हटकर, पुणें

---

[ आपण उपस्थित केलेल्या शंकेला ज्या वरील विद्वान् विचारवंतांनीं अत्यंत आस्थापूर्वक उत्तरें दिलीं, त्यांचे मूळ पत्रलेखक श्री. वि. ज. सहस्रबुद्धे हे मनःपूर्वक आभार मानूं इच्छितात. ]

डॉ. मा. स. केळकर

# संस्कृति आणि स्त्रीविषयक दृष्टिकोन

गेल्या शंभर वर्षांत भौतिक शास्त्रांच्या प्रगतीबरोबर उत्क्रांतिवाद, मानसशास्त्र, समाजशास्त्र इत्यादि नवीं शास्त्रें निघून, मनुष्याच्या जीवनांतील प्रत्येक गोष्टीचा निरनिराळ्या दृष्टीनें विचार होऊं लागला आहे. भौतिक शास्त्रांत दर दहा वर्षांत अकल्पित प्रगति झाल्यामुळें, दर पिढीस जीवनाची घडी कांहीं दृष्टींनीं सुधारली असल्यामुळें या प्रगतीला केवळ सुधारणा न म्हणतां, पाश्चात्त्य संस्कृति म्हणण्यांत येते. पण पूर्वीपासून समाजांतील सर्व व्यवस्था पुरुषांनीं स्वतःच्या सुखांच्या दृष्टीनें केली असून तीच रीत अजून चालू असल्यानें, स्त्रीजातीला पाश्चात्त्य समाजांतहि मानाचें स्थान मिळालें नाहीं. कार्ल मार्क्सनें म्हटलें आहे कीं "सामाजिक संस्कृतीचें एक गमक समाजांतील स्त्रियांची स्थिति हें आहे"; याप्रमाणें पाहिलें तर स्त्रीजातीची स्थिति गुलामापेक्षां विशेष सुधारलेली नाहीं. गेल्या शंभर वर्षांत ही जाणीव बऱ्याच स्त्रियांस व पुरुषांस होऊन, स्त्रीस गुलाम केल्यामुळें, पुरुषाचाहि ऱ्हास झाला आहे व तो थांबविण्यास तिची स्थिति सुधारली पाहिजे, अशी चर्चा तिकडे गेल्या शतकापासून सुरू आहे. इंग्लंड व अमेरिकेंत राजकीय हक्कांसाठीं स्त्रियांनी चालू शतकांत बरेच यत्न करून, ते त्यांना मिळाले. गेल्या दोन युद्धांमध्यें मनुष्यबळ कमी पडल्यामुळें, स्त्रियांस बहुतेक कामें शिकावीं लागलीं व आतां धंद्याच्या दृष्टीनें त्यांना सर्व धंदे मोकळे झाले आहेत. पाश्चात्त्य देशांत हे हक्क मिळण्यास सुरवातीस बऱ्याच स्त्रियांस तुरुंगवासहि सोसावा लागला. आमच्याकडील स्त्रियांना हे हक्क आपोआप मिळाले आहेत. त्यामुळें त्यांना राजकीय लढ्यांत बराच भाग घेतां आला. तरी पाश्चात्त्य व हिंदी स्त्रियांची सामाजिक गुलामगिरी कमी झाली नाहीं. कारण कायद्याच्या दृष्टीनें पुरुष व स्त्री सारखीं असलीं तरी जोंपर्यंत लैंगिक नीति पुरुषांना निराळी व स्त्रियांना निराळी राहील तोंपर्यंत इतर हक्क मिळाले म्हणून, स्त्रीला समाजांत मानाचें स्थान मिळालें असें होत नाहीं.

इतर प्राण्यांत प्रत्येक स्वतंत्र असल्यानें मादीचें जीवन विशेष निराळें नसतें. कांहींत नर व मादी यांच्या शरीरांत फरक असतो तो नराचे कांहीं भाग विशेष वाढून होतो, व त्यामुळें कांहींत नरांचें सौंदर्य वाढतें. हीं गोष्ट मोरामध्यें सर्वांत जास्त दिसते. ज्या नर–हार्मोनमुळें हे भाग वाढतात त्यामुळें नरांचें शरीर जरा मोठें व सशक्त असतें; तरी त्यांचें आयुष्य जास्त नसतें. दीर्घायु लाभण्यास मेंदू व मज्जासंस्था काटक असावी लागते. मादीमध्यें मुलें उत्पन्न करण्याचे श्रम सोसण्यासाठी ती जास्त काटक असते.

### स्त्री ही भोग्य वस्तु

निसर्गांतील या गोष्टी माणसांतहि आहेत. पण त्याला स्वतःबद्दल विचार करतां आल्यामुळें व स्वतःची कल्पना आधीं शरीरापुरती असल्यानें, इतर कांहीं प्राण्यांप्रमाणें आपलें शरीर सुंदर नाहीं हा न्यूनगंड ऊर्फ मनाचा रोग आदिवासींत उत्पन्न झाला. त्याचा परिणाम शरीरास रंग लावून, रंगित फुलें व पिसें अंगावर घालून शरीरसौंदर्य वाढतें या कल्पनेंत झाला. हा रोग आनुवंशिकतेनें व रूढीनें सुधारलेले म्हणवणाऱ्या माणसांतहि कायम आहे. कारण आत्मिक जाणीव व तिच्यामुळें येणाऱ्या नीतीच्या व धर्माच्या कल्पना अपवादभूत व्यक्तींनी आचरणांत आणल्या तरी शेंकडा ९९ लोकांत या कल्पना फक्त बडबडीपुरत्या राहून, रोजचें जीवन केवळ शारीरिक असतें, आणि शरीराकडे दृष्टि जातांच शक्तीपेक्षां सौंदर्याचें महत्त्व जास्त वाटतें. शक्तीची कल्पना स्वतःस असली तरी मनुष्य स्वतःकडे दुसऱ्याच्या दृष्टीनें पहातो; म्हणून रूढ कल्पनांप्रमाणें आपण सुंदर दिसावें असा यत्न प्रत्येकजण करतो.

प्राणी व वनस्पती यांची उत्क्रांति ऊर्फ उन्नति होत असतां, कांहीं जाती कायम राहून, आज जशा उत्क्रांतींतील बऱ्याच पायऱ्या दिसतात, त्याप्रमाणें माणसांत निरनिराळ्या देशांत मनाची वाढ होतांना विचार व आचारांत जे बदल होत गेले त्यांतील बरेच प्रकार निरनिराळ्या मनुष्यसंघांत हजारों वर्षें कायम राहिले आहेत. धर्म ही संस्कृति समजून ती कायम ठेवण्याच्या कल्पनेमुळें तो धर्म स्थापन झाला त्यावेळच्या बऱ्याच समाजरीतीहि धर्माचें अंग समजून कायम ठेवण्यांत येतात. यामुळें खऱ्या संस्कृतीचीं कांहीं लक्षणें एका धर्मांत दिसतात तर कांहीं दुसऱ्यांत दिसतात, व त्याबरोबर पाशवी वृत्तींचा भाग असतो.

प्राण्यांत नर थोडा सशक्त असला तरी मादी अशक्त नसते व लैंगिक संबंधांत नर तिच्यावर जबरी करूं








शकत नाहीं. माणसांत ही स्थिति बदलून, स्त्री अशक्त व नाजूक झाल्यानें किंवा केल्यानें, तिला व्यक्तित्व न राहून ती पुरुषाच्या मालकीची एक भोग्य वस्तु झाली. प्राचीन संघांतील स्त्रिया पुरुषांच्या समाईक मालकीच्या होत्या; पुढें कुटुंबव्यवस्था झाल्यावरहि अनेक भावांत मिळून एक स्त्री करण्याची रीत होती व अजून कांहीं देशांतील कांहीं लोकांत ती आहे. घरीं पाहुणा आल्यास अन्नाबरोबर लैंगिक भूक भागविण्यास घरांतील स्त्री तयार असे. ही स्थिति महाभारतांतील कांहीं गोष्टींवरून समजते व सध्या कांहीं डोंगरी लोकांत आहे. ज्यू लोकांचा प्राचीन राजा सॉलोमन याच्या लग्नाच्या व ठेवलेल्या मिळून एक हजार बायका होत्या अशी कथा आहे. त्या काळच्या बायकांविषयीं ( एक्लिझिॲस्ट ७–२६ मध्यें ) म्हटलें आहे: 'स्त्री मरणापेक्षांहि कटु आहे, तिचें हृदय जाळयांत धरण्याचा पिंजरा आहे व हात हे बांधण्याचे पट्टे आहेत.' या बाबतींत वरील लेखक आमच्या मनुस्मृतिकाराचा भाऊ शोभतो ! आमच्याकडे पूर्वी समाजांतील वारांगना राजाच्या मालकीच्या समजल्या जात व कोणा पुरुषाला त्यांच्याकडे जायला त्याची परवानगी लागे. वल्लभसंप्रदायांत मुलीचें लग्न झाल्यावर तिच्याशीं आधीं धर्मगुरूनें संग करण्याची चाल होती व अजून कांहीं ठिकाणीं असेल. या चालीविषयीं हॅव्हलॉक एलिस म्हणतो कीं यामुळें वधू पतीशीं संग करण्यास तयार होते. सारांश, पुरुषांच्या समाजांत जुन्या काळापासून स्त्रीला भोग्यवस्तु व अन्नवस्त्रांवर काम करणारी दासी समजल्यामुळें, पुरुषांच्या लैंगिक नीतीच्या कल्पना अजून प्राथमिक अवस्थेंत राहिल्या आहेत.

अनेकपत्नीत्वाऐवजीं एकपत्नीत्व बोलण्यांत व कायद्यांत आलें तरी व्यवहारांत किती प्रमाणांत आहे हें अलीकडे प्रसिद्ध झालेल्या किन्से रिपोर्टवरून समजतें. "संयुक्त संस्थानांत विवाहापूर्वी शेंकडा ८५ पुरुषांनीं व शें. ५० मुलींनीं लैंगिक अनुभव घेतलेला असतो, व विवाहानंतर शें.५० पुरुष व शें.४० स्त्रिया इतरांशीं चोरटा संबंध ठेवतात. धार्मिक म्हणवणारांची लैंगिक नीति बरीच कमी असते ( म्हणजे धर्माच्या पांघरुणाखाली चोरटे प्रकार होतात ). पुरुषांना वाटतें कीं स्त्रियाहि आपल्यासारख्याच कामलोलुप असतात, पण अनुभव निराळा येतो. बहुतेक पुरुष संगासाठीं लग्न करतात, पण स्त्रियांस घर व मुलांची इच्छा जास्त असते. शेंकडा फक्त ५ तरुणींना लग्नापूर्वी या विषयाची माहिती असते." ( 'लाइफ' ५–१०–५३ ). यावरून इतर देशांची कल्पना होईल. यास आधुनिक रशिया अपवाद असेल. कारण १९३५ पासून तेथें वेश्यांचा वर्ग नाहींसा केला आहे व त्यामुळें लैंगिक रोगहि नाहींसे झाले आहेत पूर्वीचे विवाह प्रेमाशिवाय व वधूच्या संमतीशिवाय झालेले होते. म्हणून तेथें मागतांच घटस्फोट मिळे. पुढें तरुण व तरुणींस आधीं मिळवती करून, नंतर प्रेम जडेल तशीं लग्नें होऊं लागल्यावर घटस्फोट जास्त कठिण करण्यांत आला. यासंबंधीं जास्त माहिती डायलन कार्टर यांच्या 'सिन अँड सायन्स' ( प्रकाशक–करंट बुक हाउस, मुंबई १ ) या पुस्तकांत पहावी.

## भिन्न धर्मांतील स्त्रीविषयक रूढी

ज्यू लोकांत स्त्रियांना कांहीं हक्क नव्हते, म्हणून मोझेसनें म्हटलें होतें कीं 'पतीला स्त्री सदाचारी नाहीं असें वाटेल तर त्यानें तिला सोडचिठ्ठी देऊन, घराबाहेर जाण्यास सांगावें. पुढें वाटल्यास दुसऱ्या कोणीं तिच्याशीं लग्न करावें.' ( 'ड्युटरॉनॉमी', अ. २४–१ व २ ). येशूला जेव्हां असें करणें योग्य आहे कां असें विचारलें तेव्हां "फक्त लैंगिक दुराचारासाठीं स्त्रीला सोडावें, पण दोघांनीं पुढें लग्नें करूं नयेत' असें तो म्हणाला; कारण 'लग्नानंतर तीं दोन नसून एक होतात; ज्यांना देवानें एक केलें त्यांना माणसानें निराळें करू नये." ( मॅथ्यू, १९ – ६ व ९ ). यामुळें ख्रिस्ती लोकांत पूर्वी घटस्फोट नव्हता; पुढें कायद्यानें तो मान्य केला तरी दुसरें लग्न देवळांत धार्मिक विधीनें होऊं शकत नाहीं. अलीकडे अँथनी ईडननें आधींच्या स्त्रीला घटस्फोट करून सोडलें होतें. म्हणूनच चर्चिलच्या पुतणीशीं त्याचें लग्न देवळांत होऊं शकलें नाहीं. जुन्या रूढीपुढें दोन मंत्र्यांस हार खावी लागली. कारण जुनी राजकीय परंपरा टिकवूं पहाणाऱ्या सनातनी पक्षाचे ते पुढारी आहेत.

मुसलमानांत स्त्रीला आत्माच मानीत नाहींत, यामुळें त्यांच्यांत अनेकपत्नीत्व व घटस्फोट आहे. हिंदू लोकांत रूढींत व कायद्यांत एकपत्नीत्व कधींच नव्हतें. म्हणून त्याला अपवाद झालेल्या रामाची त्यासाठी स्तुति होते. याज्ञवल्क्यस्मृतींत दुसरी स्त्री करण्यास पुढील कारणें दिलीं आहेत : "स्त्री जर सुरापी, व्याधिग्रस्त, धूर्त, वंध्या, खर्चिक, दुरुत्तरें बोलणारी,








मुलीच होणारी किंवा पतिद्वेषी असेल तर दुसरें लग्न करावें. " (७३). यांत घटस्फोटाचा उल्लेख नाहीं. पण हा विधि ब्राह्मणांशिवाय इतर जातींत जुन्या काळापासून रूढ आहे. ब्राह्मविवाहविधींत ' सखा सप्तपदी भव ' म्हणजे ७ पावलें चालल्यानें पतिपत्नी एकमेकांचे मित्र झाले अशी कल्पना आहे, तरी स्त्रीला कोणतेंहि धर्मकर्म स्वतः करण्याचा हक्क नाहीं. पतीच्या धर्मकर्मांत सहभागी होण्यानें, मृत्यूनंतर त्याला जो लोक मिळेल तो तिला मिळेल; पण दुराचारी पति नरकांत गेला तर त्याच्या पतिव्रता स्त्रीला कोणता लोक मिळेल हे स्पष्ट सांगितलें नाहीं. " दारू पिणारी ब्राह्मणी पतिलोकास न जातां पुढें कुत्री वा डुक्करी होईल " असें याज्ञवल्क्य म्हणतो ( प्रायश्चित्त–२५६ ). पण पति पीत असल्याशिवाय ब्राह्मणी कशी पिणार ? दायभागांत तो म्हणतो : "जिला स्त्रीधन नसेल तिला मुलाइतका वांटा व स्त्रीधन असेल तिला अर्धा वांटा मिळावा; बहिणींना भावांनीं आपल्या वांट्यांतून चवथा भाग द्यावा. " (१२३, १२४). विधवांच्या वांट्याच्या लोभामुळें हिंदूंत, विशेषतः बंगालमध्यें, नवऱ्याच्या प्रेताबरोबर जाळून घेणारीची स्तुति करून, तिनें आधीं स्वेच्छेनें सती जावें असे यत्न होत व सती न जाणाऱ्या विधवांस हरप्रकारें छळून, त्यांना जीव नकोसा करण्यांत येई. यामुळें बऱ्याच विधवा सती जाण्यास तयार होत; कांहींना आगीचे चटके सहन न होऊन त्या बाहेर पळून येत व त्यांना बांधूनें चितेंत ढकलण्यात येई. ही दुष्ट रूढि ब्राह्मधर्माचे संस्थापक राममोहन राय यांच्या १८२० ते–२९ या वर्षांतील सतत यत्नामुळें ४।१२।१८२९ च्या कायद्यानें लॉर्ड बेंटिंकनें रद्द केली. अगदीं आदिवासीपासून, स्त्रीला कमी समजण्याचें एक कारण वयांत आल्यापासून निघणारा रक्तमिश्रित मासिक स्राव आहे. रक्त हें अशुद्ध समजल्यामुळें स्राव निघत असेपर्यंत स्त्रीला अशुद्ध व त्यामुळें अस्पृश्य समजण्यांत येई. अजूनहि बऱ्याच लोकांत ही चाल आहे. हिंदूंत तिला ३ दिवस बाहेर ठेवतात. पण पारशी व ज्यू लोकांत ७ दिवस ठेवतात. ज्या लोकांत तिला अस्पृश्य समजत नाहींत, त्यांतहि कांहींत तिला देवळांत मुख्य वेदीजवळ जाऊं देत नाहींत. प्रो. ॲशली मॉँटेग्यूच्या मतें पाळीच्या वेळीं तिच्या हातून कांहीं विषारी द्रव्य निघतें व त्यामुळें मुठींत कांहीं धान्य कांहीं वेळ धरलें तर तें उगवत नाहीं. पाळीच्या वेळीं अस्पृश्य समजल्यामुळें विशेषतः अशक्त स्त्रियांना त्यावेळीं जरूर ती विश्रांति मिळून त्यांचा फायदा होतो. सध्या नोकरी करणाऱ्या स्त्रियांस बाळंतपणासाठीं २–३ महिने पगारी रजा मिळते. पण पाळीच्या वेळीं मिळत नाहीं.

## स्त्रियाच स्त्रियांच्या शत्रू

अलीकडे स्त्रियांना राजकीय हक्क व आर्थिक स्वातंत्र्य मिळालें तरी त्यांना पुरुषांप्रमाणें समान हक्क मिळाले नाहींत अशी तक्रार पाश्चात्त्य देशांत व आमच्याकडे अजून चालू आहे. पण हे समान हक्क कोणते व कसे मिळवावेत याची स्पष्ट चर्चा होत नाहीं. आज स्त्रियांचे खरे शत्रू पुरुष नसून स्त्रियाच आहेत हें शिक्षित स्त्रियांना समजलें पाहिजे. या देशांत सनातनी व अशिक्षित वर्ग बराच मोठा असला तरी शिक्षित स्त्रियांनीं एकजुटीनें आपली व अडाणी स्त्रियांची स्थिति सुधारूं म्हटलें तर तें त्यांना शक्य आहे. प्रश्न हा आहे कीं आपली गुलामी सोडण्याची खरी इच्छा व कळकळ किती जणींत आहे ? सामाजिक व लैंगिक नीतीचे नियम पुरुषांसाठीं निराळे व स्त्रियांत निराळे असण्याचें कारण स्त्रियांची ह्यास संमति आहे किंवा विरोध करण्याची शक्ति त्यांना नाहीं. म. गांधींनीं राजकीय गुलामी चालू राहण्याचें कारण हेंच सांगितलें होतें कीं बरेच लोक सहकारानें परकी सत्तेला मदत करतात म्हणून ती टिकते. जर असहकारानें आम्हांस राजकीय स्वातंत्र्य मिळालें तर स्त्रियांना त्याच उपायानें सामाजिक हक्क कां मिळणार नाहींत ? त्यांच्यांत एकी होईल तर त्यांना यश मिळेल. समान हक्क मिळवू पहाणाऱ्या हिंदी स्त्रियांपुढें आज हा प्रश्न आहे कीं पाश्चात्यांप्रमाणें पुरुष स्वैर वागतात म्हणून स्त्रियांनींहि स्वैर वागावें किंवा पुरुषांना नीतीचीं बंधनें पाळण्यास लावावें ? आतांपर्यंत रूढि हाच धर्म मानल्यामुळें मनुष्याचा ऱ्हास झाला; आतां आत्मिक समानतेच्या व ध्येयाच्या पायावर समाजरचना करून, संस्कृति वाढवण्याची वेळ आली आहे. हें महत्त्वाचें काम हिंदी स्त्रियांना करणें शक्य आहे, कारण अजून त्यांची नीति जास्त बिघडलेली नाहीं.

## पुरुषाची अक्कल दुपारी

आदीवासींनी जेव्हां रंग व पीसें लावून आपलें सौंदर्य वाढविण्याचा यत्न केला तेव्हांपासून हा हक्कहि








निसर्गाप्रमाणें पुरुषाकडेच होता व अजून त्यांनीं तो पुरुषाकडेच ठेवला आहे. कांहीं वर्षांपासून 'इलस्ट्रेटेड विकली'मध्यें या व इतर देशांतील आदिवासींचीं चित्रें व माहिती येत असते, तिच्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. १५-६-५३ च्या 'लाइफ'च्या आफ्रिकेसंबंधीं अंकांत तिकडील बऱ्यांच आदिवासींची चित्रासह माहिती आहे ती जिज्ञासूंनीं पहावी, म्हणजे शरीराला रंग लावल्यानें तें सुंदर दिसतें ही कल्पना आदिवासी मनुष्याची आहे हें समजेल. मानसशास्त्राप्रमाणें हा न्यूनगंड इष्ट नसून पुढील मनाच्या रोगांचें मूळ कारण आहे. म्हणून आतां सौंदर्याच्या कल्पना बदलल्या पाहिजेत. पुरुषांचीं शेतीचीं व इतर कामें वाढलीं तेव्हां त्यांना आपल्या शरीराचें सौंदर्य वाढविण्यास वेळ राहिला नाहीं, म्हणून त्यांनी ही गोष्ट स्त्रियांकडे सोंपविली. निसर्गांत नराचें सौंदर्य वाढण्याचें कारण त्याच्या अधिक कामवासनेस माद्यांनीं तयार व्हावें हें आहे. माणसांत अल्पवयापासून वरचेवर मुलें होण्यानें स्त्रिया अशक्त झाल्यामुळें पुरुषाला सुंदर दिसण्याचें कारण राहिलें नाहीं. त्याऐवजीं त्यानें स्त्रीची मनोरचना बदलून टाकली. स्त्री जात्याच अशक्त, पण सुंदर असल्यामुळें तिचा सांभाळ करण्याचे पतकरून, तिला सौंदर्य वाढविण्याची पूर्ण सवलत मिळाली. आफ्रिकेत मसाई नावांच्या संघांत स्त्रियांना रंग लावूं दिला तरी केस ठेवण्याचा हक्क नाहीं; तो पुरुषांनीं स्वतःकडे ठेवला आहे. पुढें वर सांगितल्याप्रमाणें पुरुषांचीं कामें वाढलीं तेव्हां घामामुळें केस व दाढीची अडचण वाटून त्यांना रजा मिळाली व गेल्या शतकांत युरोपांत मिशीलाहि रजा देण्याची फॅशन निघाली. स्त्रीच्या चेहऱ्याचें सौंदर्य डोकीवरील केसानें वाढतें इतकेंच नाहीं तर ते केस लांब ठेऊन त्यांची मागें वेणी घालून व तिच्यावर फुलें घालून, तिचें सौंदर्य वाढतें अशी तिची मनोरचना करण्यांत आली. हें पुरुषांनीं केलें तरी त्यावर निसर्गाचा छाप मारून त्यांनीं आपली सोडवणूक केली. यांत त्यांनीं बरीच अक्कलहुशारी दाखविली यांत शंका नाहीं.

निसर्गानें स्त्रीला लांब व मऊ केस दिले असले तरी त्यांची आवड निसर्गानें दिली नसून ती परिस्थितीप्रमाणें उत्पन्न होते. स्वातंत्र्यवीर बॅ. सावरकर यांनीं अंदमानांतील आदिवासींचें वर्णन देतांना म्हटलें आहे कीं त्यांतील स्त्री नवऱ्याकडून काचेच्या तुकड्यानें आपले केस काढून घेते. युरोपातील बऱ्याच मठवासिनी स्त्रिया केस ठेवीत नाहींत व इकडील संन्यासिनीहि केस मुळीच ठेवीत नाहींत. सारांश, निसर्गानें फक्त शरीर दिलें आहे व मनोरचना परिस्थितीप्रमाणें होत असते. समाजांतील बहूतेक रूढी पुरुषांच्या सुखासाठीं करण्यांत येऊन, त्यांतील महत्त्वाची गोष्ट स्त्रीची मनोरचना आहे, व ही तयार करण्यांत स्त्रियांचें बरेंच साहाय्य झालेलें आहे. गुलामांनाहि जोंपर्यंत जगायची इच्छा असते तोपर्यंत असेल त्या स्थितींत आनंद मानून जगण्याची वृत्ति होते, ही गोष्ट इकडील अस्पृश्यांवरून, अमेरिकेतील नीग्रो गुलामांवरून व आधुनिक रशियांतील राजकीय कैद्यांवरून स्पष्ट होते. वर रशियांतील कांहीं सुधारणांचा उल्लेख केला आहे. त्याबरोबर हेंहि सांगणें जरूर आहे कीं कम्युनिस्ट मताविरुद्ध चुकून कांहीं शब्द निघाला तर त्यास कैद होऊन सैबेरियांत पाठवतात. तेथें अपुऱ्या अन्नावर मरेतों काम घेतात. ही गोष्ट १९५३ सालच्या 'युनो'च्या रशियासंबंधीं कमिटीच्या रिपोर्टांत आहे ('लाइफ' २४-८-५३). यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. आतांपर्यंत सर्व देशांत स्त्रीजातीचा जसा छळ झाला तितका पुरुषगुलामांचाहि झाला नसेल. अल्प वयांत लग्न होऊन सासरीं गेलेल्या मुलीचा इकडील सास्वा व इतर लोक कसा छळ करीत व अजून करतात हें आमच्या लोकांना सांगायला नको. बारा वर्षें वयापूर्वी नवऱ्यानें संबंध ठेवूं नये असा कायदा १८९१ साली या देशांत करावा लागला. १-१॥ वर्षांनें होणाऱ्या बाळंतपणामुळें कितीतरी स्त्रिया पाश्चात्त्य देशांतहि क्षय व इतर रोगांनीं २५-३० च्या सुमारास मरत असत व अजून बऱ्याच देशांत मरतात. इकडे एका बाईस १८-२० मुलें झाल्याचें मी ऐकलें आहे; पाश्चात्त्यांत ही संख्या २८ पर्यंत गेल्याचें समजतें. अलीकडे पाश्चात्त्यांत संततिनियमनानें मुलांची संख्या कमी झाली. पण, स्वैरनीतीमुळें कुमारिकांस राहणारे गर्भ पाडतांना कांहीं तरुणी मरतात व नियमनाचें साधन यशस्वी झालें नाहीं म्हणजे विवाहितांना राहणारे गर्भहि पाडण्यांत येऊन, त्यांत कांहीं स्त्रिया मरतात. शिवाय हजारों गर्भ आपोआप पडतात. लाखों मुलें पहिल्या कांहीं वर्षांत जातात. हा







हा सर्व विचार केला तर मानवी समाजांतील किती शक्ति व पैसा व्यर्थ जात आहे हें लक्षांत येऊन, आदिवासीपेक्षां आपणांस सुधारलेला समजणारा मनुष्य खरोखरी दुर्गतीस जात आहे असें म्हणणें भाग पडतें.

स्त्रीनें गुलामींत आनंद मानावा म्हणून ती जात्याच सुंदर अशी तिची स्तुति होते, पण तिच्या कातडीचा रंग साधा असल्यामुळें पूर्वीं तिला रंग लावीत त्या ऐवजीं कपड्यास अनेक रंग देऊन व त्यावर नकशी काढून तिचें सौंदर्य वाढवण्यांत येऊं लागलें. पूर्वीं स्त्रीनें केस ठेवले तरी त्यांचें प्रदर्शन होत नसें व कांहीं लोकांत लग्नानंतर स्त्रीला पडद्यांत ठेवण्यांत येई. ही चाल आमच्या कांहीं प्रांतांत हिंदूंत व मुसलमानांत आहे. मारवाडी स्त्रिया रस्त्यानें पायीं मिरवीत जातात, पण तोंडावर बुरखा असतो. रजपूत व मराठे राजे व सरदार यांच्या स्त्रियांना पडदा असे. ही चाल किती जुनी आहे हे राणीला 'असूर्यपश्या' (सूर्य न पहाणारी) हा संस्कृत शब्द आहे त्यावरून समजते. 'एक नूर आदमी, दस नूर कपडा' अशी म्हण आहे. पण सौंदर्य फक्त रंगीत कपडे व तऱ्हेतऱ्हेच्या केशभूषांनीं पुरें होत नाहीं; कारण या गोष्टी गरीबहि करतात. समाजांत मोठेपणा श्रीमंतीनें येतो व तिचें प्रदर्शन पुरुष कांहीं दागिने घालून करतात. पण बायकामुलींना कपड्यांनीं व दागिन्यांनीं सजवून, विशेष प्रसंगीं रस्त्यानें मिरवत जाणें ही नवी रीत श्रीमंतीच्या प्रदर्शनासाठीं पुरुषांनीं पाडली आहे. एका समारंभाच्या वेळीं एका लॉर्डनें आपल्या पत्नीला दागिन्यांनीं कशी सजवली होती हें डिकन्सनें एका कादंबरींत सांगितलें आहे. मध्यम वर्गांतील मारवाडी स्त्रीच्या अंगावर सुमारें शेरभर सोनें असतें. शिवाय मोत्याचे व ऐपतीप्रमाणें हिऱ्यांचे दागिने असतात.

## सौंदर्यसाधनाचें आणखी एक नवें काम

हॅव्हलॉक एलिसनें म्हटलें आहे कीं इंग्लंडमध्यें १९०७ च्या सुमारास स्त्रियांनीं राजकीय हक्कांसाठीं चळवळ केली तेव्हा बऱ्याच जणींनीं केस आंखुड केले होते; पुढें चळवळ संपल्यावर पुनः लांब केसांनीं सौंदर्य वाढतें अशी कल्पना वाढून तें लांब ठेवण्यांत येऊं लागलें. जोपर्यंत त्यांना इतर कामें जास्त नाहींत, तोंपर्यंत रूढीमुळें स्त्रियांचें लक्ष उसनें सौंदर्य वाढवण्याकडे जाईल. आमच्याकडे आतां त्यांना कांहीं ऑफिसांतून कामें मिळूं लागलीं आहेत, तरी त्यांचा सौंदर्याचा सोस कमी झाला नाहीं; कारण पुस्तकी शिक्षणानें स्वतः विचार करतां न येऊन, जबाबदारी वाटत नाहीं. म्हणून कामावर जातांना 'वधूचा पोषाख करूं नये' अशी सूचना द्यावी लागली. काउंट टॉलस्टॉयनें एकदां म्हटलें होतें कीं 'एका खंडाच्या एका बाजूकडून दुसरीकडे जाण्यास लागणारा आगगाडीचा मार्ग करण्यास जितके श्रम लागतील त्यापेक्षां जास्त श्रम सुंदर दिसण्यासाठीं होत आहेत.' त्याचा मुद्दा हाच कीं फक्त इतके श्रम व्यर्थ जात आहेत. पण या श्रम व खर्चामुळें तरुण विद्यार्थ्यांची नीति बिघडत आहे, हा विचार केला पाहिजे व स्त्रियांनीं रंगीबेरंगी कपडे व दागिने वापरणें बंद केलें पाहिजे. पूर्वीं त्यांना आर्थिक स्वातंत्र्य नव्हतें म्हणून लग्न हा एकच धंदा त्यांच्यापुढें होता; त्यामुळें लवकर लग्न होण्यासाठीं सौंदर्यसाधन करण्याची जरूरी वाटे. यापुढें मिळवत्या कुमारींनीं संयम करूं शकेल अशा तरुणाशींच लग्न करण्याचा निश्चय केल्याशिवाय पुरुषांची नीति सुधारणार नाहीं. हॅ. एलिस म्हणतो कीं कांहीं आया मुलींना लग्नाच्या वेळीं सांगतात कीं नवऱ्याच्या इच्छेस कबूल झालें पाहिजे. पण पत्नीनें वेश्यावृत्ति पतकरल्यानें हा प्रश्न सुटत नाहीं; कारण गर्भारपण, बाळंतपण व इतर आजार यावेळीं त्यानें संयम कसा करायचा हा प्रश्न राहतो. हा लहानपणापासून साधा आहार व साधें पण ध्येयपूर्ण जीवन यानेंच सुटणार आहे.

आमच्यांत जुनी समजूत अशी आहे कीं पत्नीचीं कर्तव्यें चूल व मूल संभाळणें हीं आहेत. त्यांत नीतीचा विचार नव्हता. रूढीप्रमाणें ठराविक पदार्थ करणें म्हणजे चूल संभाळणें; ते खुसखुशीत व चवदार असले म्हणजे ती 'सुगृहिणी' अथवा सुग्रण समजत. तसेंच मुलांना वेळच्या वेळीं खायला घालून संभाळलें म्हणजे तिचें काम संपत असें. आतां या दोन्हीचें क्षेत्र बरेंच वाढलें आहे. पाश्चात्त्यांतहि पूर्वीं कल्पना होती कीं स्त्रीचें क्षेत्र घर आहे, पण शिक्षणामुळें तिकडेहि आतां असें म्हणतात कीं गृहिणीनें आरोग्यासाठीं कोणते पदार्थ, काय प्रमाणांत कसें तयार करून खायला घालावेत हें शिकले पाहिजे. तसेंच भावी पिढी चांगली होण्यासाठीं आपलें आरोग्य कसें ठेवावें, गर्भारपणांत गर्भाची योग्य वाढ होण्यास काय करावें व जन्मल्या-








पासून मुलांच्या शारीरिक व मानसिक वाढीकडे कसें लक्ष द्यावें हें शिकून त्याप्रमाणें तिनें वागलें पाहिजे. म्हणजे आतां चूल व मूल सांभाळणें इतर सर्व कामांपेक्षां कठिण पण महत्त्वाचें झालें आहे. सनातनी लोकांच्या मतें निसर्गानें स्त्री व पुरुषांच्या शरीरांत फरक करून, त्यांचीं कर्तव्यक्षेत्रें निराळीं केलीं आहेत. म्हणून त्यांचे कौटुंबिक व सामाजिक हक्क सारखे असणें शक्य नाहीं; पण ते हें विसरतात कीं इतर प्राण्यांत नरमादींचीं शरीरें निराळीं असतांहि त्यांचें इतर जीवन सारखेंच असतें. इतर प्राण्यांत नीतीची कल्पना नाहीं व माणसांत ती आहे म्हणून ते नियम दोघांना सारखे असले पाहिजेत; पण माणसानें आपल्या नैसर्गिक भावना रूढीमुळें बऱ्याच बदलून, स्त्रीला गुलामींत आनंद मानण्यास आधीं भाग पाडलें व आतां जन्मापासून मुलींना निराळें वागवून व त्यांच्यामागें सौंदर्यसाधनाचें नवें काम लावून, नैतिक भावनेऐवजीं वेश्यावृत्ति निर्माण केली आहे. त्यामुळें माणसांतील माणुसकी नष्ट झाली आहे, व शारीरिक त्रास तर होतच आहे. अजून आफ्रिकेंतील ३-४ मसाई मिळून भाल्यानें सिंहालाहि मारतात; सुधारलेला मनुष्य मचाणावर बसून, हाकलून आणलेल्या वाघाला बंदुकीनें मारण्यांत भूषण मानतो. गेल्या शतकांत पाश्चात्त्यांत स्त्रिया उघडपणें दारू व सिगरेट पीत नव्हत्या, त्या आतां पिऊं लागल्या. हा अधःपात सुधारण्यास मुलांमुलींना सारखे नीतिनियम लावून, त्यांची योग्य वाढ केली पाहिजे. सध्या मुलींना संयुक्त-संस्थानांत बरेंच स्वातंत्र्य मिळालें आहे, तरी तीन चतुर्थांश मुलींना आपण पुरुष झालों असतों तर चांगलें झालें असतें असें वाटत असतें, व निरुपाय म्हणून त्या जीवन जगत असतात. यामुळें गेल्या ३० वर्षांत तिकडे स्त्रियांना जास्त प्रमाणांत वेड लागून, त्यामुळें मरणारांची संख्याहि पुरुषांपेक्षां शेकडा ४० नें अधिक आहे. ही स्थिति सुधारण्यास त्यांना मानानें जगता येईल असें केलें पाहिजे.

यासाठीं प्रौढ स्त्रियांनीं स्वतः संवय म्हणून लांब केस ठेवले तरी नटणें बंद केलें पाहिजे व मुलींचे केस पहिलीं ८–१० वर्षेंपर्यंत तरी आंखुड ठेवून व पोषाख साधा ठेवून, त्यांना नटण्याची इच्छा न होईल असें केलें पाहिजे. श्री. गिजूभाई बधेका व ताराबाई मोडक पूर्वीं भावनगरला पूर्व-प्राथमिक शाळा चालवीत असतां शाळेंतील मुलींचे केस आंखुड असावेत असा नियम केला होता; पुढें ती शाळा बंद पडून, ताराबाईंनीं दादर व बोर्डीस तशा शाळा काढल्या, पण त्यांत हा नियम केला नाहीं. असा नियम शाळेपुरता न करतां, आयांना या सुधारणेचें महत्त्व पटवून, प्राथमिक शाळेपर्यंत मुलींचे केस आंखुड ठेवणें सुरू झालें पाहिजे. पुढें मुलींना समजूं लागल्यावर त्यांनीं वाटल्यास लांब केस ठेवावेत. सध्या फॅशन म्हणून कांहीं ख्रिस्ती व पारशी स्त्रिया आंखुड केस ठेवतात, पण पोषाखांत साधेपणा नसतो. नटवेपणामुळें पुरुषांची वासना वाढून स्त्रियांवर हात टाकण्यास उत्तेजन मिळतें. म्हणून डोकींत फुलें घालणेंहि सोडलें पाहिजे. मुलींनी आत्मरक्षणापुरती शक्ति मिळवून, निर्भयपणें समाजांत वावरलें पाहिजे.

गोरे व काळे लोक वेगळे होते तेव्हा काळ्यांस गोरे आवडत नसत, म्हणून 'पांढऱ्या पायाची' सून आणणें इष्ट वाटत नव्हतें. हजारों वर्षांपासून वर्णसंकर झाल्यानें, एका कुटुंबांत गोरीं व काळसर मुलें होऊं लागून, काळ्या पुरुषाला गोरी बायको हवीसें वाटूं लागलें व काळसर मुलींचीं लग्नें होणें कठिण व खर्चाचें झालें. सुदृढ मुलें होण्यास स्त्री साधारण ५। ते ५॥ फूट असणें इष्ट आहे पण आमच्या मुलींची साधारण उंची ५ फूटाहून कमी असल्यामुळें उंच पुरुषहि ठेंगू मुली पसंत करतात. जात, शिक्षण, हुंडा इत्यादि गोष्टींमुळेंहि लग्न जमणें कठिण होतें. प्रत्येक मुलीचें लग्न झालेंच पाहिजे व तें २५ च्या आंत झालें पाहिजे या कल्पना सोडून, नैतिक सुधारणेसाठीं प्रत्येकीला आपलें पोट भरतां येईल असें शिक्षण दिलें पाहिजे, व लग्न तिच्या इच्छेवर ठेवलें पाहिजे. लोकसंख्या आटोक्यांत आणण्यास बाह्य साधनांऐवजी उशीरा लग्न करणें हा मूळ माल्थसनें सुचविलेला उपायच आरोग्यास इष्ट होईल.

शेवटीं स्त्रियांच्या नोकरीचा विचार केला पाहिजे. त्यांना आपलें पोट भरतां आलें पाहिजे यांत शंका नाहीं. पूर्वीपासून शेतकरी व मजूर वर्गांतील स्त्रिया सर्व प्रकारचीं कामें करीत आहेत आणि खेडेगांवांत वरच्या वर्गांतील स्त्रियांना पूर्वीं बरींच श्रमाचीं कामें करण्याची संवय होती शारीरिक श्रमाच्या प्रमाणांत आरोग्य व शक्ति राहते. म्हणून शिक्षित स्त्रियांनींहि कोणतेंहि श्रमाचें काम टाळूं नये. सध्या सर्व देशांत








बेकारी वाढल्यानें पुरुषांनाहि काम मिळणें कठीण झालें. मग स्त्रियांना नोकरी मिळणें जास्त कठिण व्हावें यांत नवल नाहीं. बेकारी कमी होण्यास शिक्षित तरुणांनीं नोकरीची आशा न ठेवतां खेड्यांत काम मिळवलें पाहिजे. निसर्गाचे नियम मोडून सध्याचीं मोठीं शहरें झालीं आहेत, म्हणून तेथील कारखाने तालुक्यांत गेले पाहिजेत; पण श्रीमंतांना इतकी अक्कल येण्यास कांहीं पिढ्या जाव्या लागतील. सध्या शिक्षितांची बेकारी कमी करण्यास सरकार खेडेगांवांत प्राथमिक शाळा काढणार आहे. पण स्वराज्याचा खरा अर्थ जर शिक्षितांस समजत असेल तर सरकारनें अशा शाळा काढण्याऐवजीं त्या लोकांनींच काढल्या पाहिजेत. गांधीस्मारकमंडळानेंहि ग्रामसुधारणेची योजना केली आहे व तिच्यासाठीं बऱ्याच कळकळीच्या कार्यकर्त्यांची जरूर आहे. लग्नाच्या आधीं शिक्षित तरुण स्त्रीपुरुषांनीं अशा नव्या कामांत खेडेगांवांत कांहीं वर्षें घालवून, स्थिरता आल्यावर लग्न करणें इष्ट आहे. त्यामुळें जीवन सहजच साधें होऊन, शहरी जीवनांतील अनेक प्रश्न सुटतील.

## चाळीचाळींतून बालकमन्दिरें

ज्यांना शहरांत राहणें भाग आहे पण नोकरी मिळत नाहीं त्यांनीं—विशेषतः शिक्षित स्त्रियांनीं—चाळींतून बालमंदिरें काढावींत म्हणजे थोड्या खर्चांत सर्व मुलांना लहान वयांत जरूर तें शिक्षण मिळेल. सध्याच्या पूर्व-प्राथमिक शाळांत २॥–३ वर्षांचीं मुलें घेतात; पण त्यांच्या शिक्षणास वास्तविक जन्मापासून किंवा निदान दुसऱ्या वर्षांपासून सुरवात झाली पाहिजे. हें चाळींत राहणाऱ्या शिक्षित स्त्रियाच करूं शकतील. यामुळें मुलाची शारीरिक व मानसिक योग्य वाढ कशी करावी याचें शिक्षण मुलांच्या आयांसहि मिळेल.

बालमंदिराप्रमाणें शहरांत नोकरीवर जाणाऱ्या आयांच्या तान्ह्या मुलांकडे पाहण्याचें व त्यांना २-३ वेळां दूध पाजण्याचें कामहि चाळींतील बेकार स्त्रियांनीं करण्यासारखें आहे. कारखान्यांतून तान्ह्या मुलांसाठीं क्रेश-(creche)ची व्यवस्था असते. पण शिक्षकिणी व ऑफिसांतून कामें करणाऱ्या आयांच्यासाठीं कांहीं व्यवस्था झाली नाही; ती होणें जरूर आहे. याप्रमाणें तान्ह्या मुलांशीं संबंध आल्यानें त्यांच्या शिक्षणास तेव्हांपासून सुरवात होऊं शकेल, व पुढें ती मुलें ६–७ वर्षांपर्यंत आनंदानें शिकतील. हें सर्व करतांना निरनिराळ्या विषयांचें पुस्तकी शिक्षण घेता येईल व तें अनुभवानें पक्के होईल.

सध्या प्राथमिक शाळांतील मुलांपासून शिक्षण योग्य होण्यासाठीं घरीं शिक्षक ठेवण्याची गरज वाटूं लागली आहे. वर म्हटल्याप्रमाणें जर पहिल्या वर्षापासून मुलांची योग्य वाढ झाली व पुढें पूर्वप्राथमिक शिक्षण नीट मिळालें तर प्राथमिक २–३ इयत्ताहि चाळींतच होणें शक्य होईल. तोंपर्यंत ज्या मुलांचे कांहीं विषय कच्चे असतील त्यांना अर्धापाउण तास शिकण्याची सोय चाळींतच होणें जरूर आहे. यामुळें सध्यांच्या शिक्षणपद्धतींत काय चुका आहेत हेंहि समजून त्या सुधारतां येतील. सध्याचें शिक्षण इतकें खर्चिक झालें आहे कीं तें गरीबास सोसवत नाहीं; बरें, जे इतका खर्च करतात त्यांचीं मुलें खरोखरी काय व किती शिकतात हा प्रश्नच आहे. म्हणून शिक्षित आईबापांनीं रोज मुलाला कांहीं तरी शिकविणें हाच उत्तम मार्ग आहे. प्रसिद्ध इंग्रज मंत्री ग्लॅड्स्टन् आपल्या मुलाचा कच्चा विषय त्याला स्वतः कांहीं दिवस शिकवीत असे. याप्रमाणें आईबापांनीं मुलाला एक तरी विषय शिकविणें सुरूं केलें म्हणजे त्यांच्यांत प्रेमाचें नातें उत्पन्न होऊन मुलांचें लक्ष एकंदर अभ्यासांत जास्त लागेल.

हिंदी स्त्रियांची वैवाहिक गुलामी नाहींशी होण्यास कुंकू लावावें कीं नाहीं व मंगळसूत्र घालावें कीं नाहीं हे प्रश्नहि सोडवले पाहिजेत. कुंकू कुमारीहि लावतात, पण विधवांस बंदी आहे. कारण चेहऱ्याचें सौंदर्य वाढविण्यासाठीं तें लावायचें असतें. पुरुषांना सुंदर दिसण्यासाठीं कांहीं करण्याची जरूर वाटणें हें गुलामीचें लक्षण जर सुटलें तर कुंकू लावलेंच पाहिजे ही कल्पनाहि सोडावी लागेल. तसेंच सौंदर्याच्या कल्पना शरीरापेक्षां गुणांवर आल्या म्हणजे कुंकवाचें महत्त्व राहणार नाहीं. तीच गोष्ट मंगळसूत्राची. आर्थिक गुलामी गेल्यावर नवरा असणें म्हणजेच सौभाग्य ही कल्पना जाईल व दागिन्यांचें वेड गेलें म्हणजे गळयांत मंगळसूत्र असलेंच पाहिजे ही कल्पनाहि जाईल, व तें अमक्याच तऱ्हेचें हवें ही कल्पनाहि जाईल.










प्रा. वि. वा. कोगेकर

# परमाणु-शक्तीचे विधायक उपयोग

दुसऱ्या महायुद्धाचा निर्णायक शेवट परमाणुस्फोटकांनें केला हें सर्वविश्रुत आहे. पण त्यानंतरच्या गेल्या नऊ वर्षांत परमाणुशक्तीचा विधायक कार्यासाठीं कसा व किती उपयोग करतां येईल यावर भरपूर संशोधन झालें आहे. दुर्दैवानें त्या संशोधनाभोंवतीं असलेल्या ( कांहींशा अनिष्ट ) गुप्ततेच्या वातावरणामुळें सामान्य मनुष्याच्या मनांत त्याविषयीं एक अद्भुततेचें वलय निर्माण झालें आहे. संहाराकडून सेवेकडे झुकणाऱ्या या परमाणुशक्तीच्या नव्या स्वरूपाचें सामान्य शास्त्रीय वर्णन देऊन मानवाच्या ह्या नव्या बलशाली सेवकाचा परिचय करून देण्याचें प्रस्तुत लेखांत योजिलें आहे.

परमाणुस्फोटक तयार करण्यासाठीं ज्या तऱ्हेची योजना[1] करण्यांत आली तींत स्वल्प अवधींत प्रचंड ऊर्जा ( एनर्जी ) कशी बाहेर पडेल याचाच मुख्यतः विचार केला गेला. पण शांततेच्या काळांत परमाणु-ऊर्जा राबवावयाची असेल तर तिच्या निर्मितीच्या प्रमाणावर व प्रकारावर संपूणतया नियंत्रण ठेवतां येईल अशा तऱ्हेची योजना करणें अगत्याचें ठरलें. परमाणु-ऊर्जा-निर्मितींत क्लीबाणूं-(न्यूट्रॉन्स) च्या साहाय्यानें एक परमाणु-न्यष्टि ( न्युक्लियस् ) अस्थिर करून तिच्यांतून नवे क्लीबाणू बाहेर पडावेत व त्यांनीं परत हीच क्रिया करून एक शृंखला-प्रक्रिया ( चेन-रिॲकशन् ) सुरुं करावी अशी मूळ योजना आहे. या योजनेंत नियंत्रण ठेवण्याची जागा म्हणजे क्लीबाणूंच्या निर्मितीचें स्थळ. शृंखला-प्रक्रियेंत भाग घेणाऱ्या क्लीबाणूंच्या पहिल्या पिढीपासून दुसऱ्या पिढींत किती क्लीबाणू निर्माण होतात याचें जें प्रमाण काढतात त्याला " पैदाशीचा गुणक " ( रिप्रॉडक्शन् फॅक्टर ) म्हणतात. या गुणकाची किंमत एकापेक्षां कमी असेल तर ही प्रक्रिया थोड्याच काळांत थांबते. त्याची किंमत एकापेक्षां जास्त असेल तर प्रक्रिया फार वेगानें प्रगत होते व सर्व उपलब्ध परमाणूंचा अंतर्भेद होऊन ऊर्जा बाहेर पडते. हा प्रकार परमाणुस्फोटकांत घडतो. पण जर हा गुणक एकाइतकाच राहिला तर शृंखलाप्रक्रिया सारख्याच गतीनें चालूं राहून सर्व उपलब्ध परमाणू संपल्यानंतरच ती थांबते. आणि योजकांनीं हीच अवस्था टिकविण्यासाठीं नियंत्रण करणें जरूरीचें असतें. अशा रीतीनें नियंत्रित स्वरूपांत क्लीबाणूंची पैदास करून ऊर्जा निर्मिणाऱ्या योजनेला परमाणूंची रास ( पाईल ) असें म्हणतात. या योजनेंत जें यंत्र वापरतात त्याला परमाणुयंत्र ('न्यूक्लिअर रिॲक्टर') असें नांव देतां येईल. अशा तऱ्हेचीं यंत्रें अमेरिका, कॅनडा आणि ग्रेट ब्रिटन् या देशांत तयार केलेलीं आहेत व त्यांतून सतत परमाणु-ऊर्जा-निर्मितीचें कार्य चालूं आहे.

### परमाणुयंत्राची रचना

या यंत्राची सर्वसामान्य रचना एखाद्या शब्दकोड्याच्या चौकोनासारखी असते. त्यांतील छोटे चौकोन म्हणजे अल्युमिनियमचे चौकोनी डबे. या डब्यांतून किरणातु ( युरेनियम् ) या तेजोद्गर ( रेडिओॲक्टिव्ह ) धातूंच्या छोट्याछोट्या गोळ्या ठेवतात. व हे डबे ग्राफाईटच्या ठोकळ्यांमधून हारीनें ठेवतात. हें यंत्र सुरूं करतांना बाहेरून क्लीबाणू सोडून एका किरणातूची न्यष्टि ( न्युक्लिअस् ) अस्थिर करावयाची. एकदां यंत्र सुरुं झालें कीं, खालील गोष्टी घडून येतातः-- ( १ ) ऊर्जा उष्णतेच्या स्वरूपांत बाहेर पडूं लागते. त्यामुळें सबंध यंत्र तापूं नये म्हणून ॲल्युमिनियमच्या डब्यांभोंवतालून थंड पाण्याचा प्रवाह सारखा चालूं ठेवतात. अमेरिकेंत हॅनफोर्ड येथें असलेल्या परमाणु-यंत्रांतून बाहेर पडणारें तप्त पाणी हॅन नदींत सोडीत असत. त्या नदीचें पाणी भरपूर गरम होई. यावरून निर्माण होणाऱ्या उष्णतेची कल्पना करतां येईल. ( २ ) कांहीं महावेगी क्लीबाणू व जीवाला अपायकारक अशी विकिरणेंहि ( रेडिएशन्स् ) बाहेर उफाळतात. त्यांच्यापासून यंत्राभोंवतीं काम करणाऱ्या कामगारांना अपाय होऊं नये म्हणून कित्येक फूट जाडीच्या कॉंक्रीटच्या भिंती या यंत्राभोंवतीं बांधाव्या लागतात. यंत्र चालवि-

---

१ याबाबत प्रस्तुत लेखकानें " नव्या अस्त्राची चाहूल " ( ' नवभारत ' फेब्रुवारी ५४ ) या लेखांत माहिती दिली आहे.



अनुक्रमणिका






णारे कामगार या भिंतींच्याबाहेरून, उंटावरुन शेळया हांकण्याच्या प्रकाराप्रमाणें, दुरूनच त्यांवर नियंत्रण ठेवतात. ( ३ ) नाना तऱ्हेचे अत्यंत उपयुक्त असे तेजोद्गर पदार्थ या यंत्रांत निर्माण होतात.

परमाणु-ऊर्जेचा विधायक कार्यासाठीं उपयोग करावयाचा म्हणजे या यंत्राचा उपयोग मुख्यतः करावा लागेल. पण या यंत्राचा उपयोग करायचा म्हणजे तें चालू झालें असतांना कांहीं अपायहि घडून येणें शक्य आहे. त्यांचाहि फार गंभीरपणानें विचार केला पाहिजे हें ओघानेंच येतें.

## परमाणुजन्य उष्णतेचे संभाव्य उपयोग

परमाणुयंत्रांत बापरण्यांत येणाऱ्या न्यष्टि-इंधना-( न्यूक्लियर फ्युएेल ) नें निर्माण होणाऱ्या उष्णतेमुळें शास्त्रज्ञांना एका वेगळ्याच प्रकारच्या चिंतेंत पाडलें आहे. आजपयत उपलब्ध इंधनद्रव्यांपासून जास्तींत जास्त उष्णता कशी मिळेल यासाठीं शास्त्रज्ञांचें संशोधन चाललें होतें. पण या यंत्रांतून निघणाऱ्या उष्णतेचा योग्य उपयोग कसा करावा याचीच त्यांना आतां चिंता पडली आहे. प्रत्यक्षांत या उष्णता-ऊर्जेचा योग्य प्रकारें उपयोग करण्याचें व तदनुषंगिक अपायांचें पुरेपूर निवारण करण्याचें अत्यंत अवघड व किचकट काम स्थापत्य-व-यंत्रविशारदांना करावें लागणार आहे. त्यांच्या सर्व अडचणी दूर होतील असें गृहीत धरलें तर या उष्णतेचा खालीलप्रमाणें उपयोग करतां येईल: ( १ ) पाणी तापवून त्याचा औद्योगिक कारखान्यांत उपयोग करणें. ( २ ) हवा तापवून तिचा कारखान्यांतून वा इतरत्र जलशोषणासाठीं उपयोग करणें.—थंड हवेच्या प्रदेशांत तप्त हवा नळांच्या साहाय्यानें घरांघरांतून खेळवून उष्णतामान सुसह्य राखतां येईल. रस्त्यांतून जर ही हवा खेळविली तर हिवाळयांत सांठणारें बर्फ वितळवून वाहतुकीतील अडथळे दूर करतां येतील. अशा तऱ्हेचा प्रयोग नुकताच अमेरिकेंतील अेका गांवांत करण्यांत आल्याचें पुष्कळांनीं वाचलें असेल. (३) पाण्याची वाफ तयार करून तिचा विद्युत्-शक्ति-निर्मितीसाठीं उपयोग करणें.—अर्थात् या बाबतींत व्यावहारिक दृष्टीनें किंमतीचाहि विचार करावा लागेल. कोळशापासून वा पाण्यापासून निर्माण होणाऱ्या विजेपेक्षां परमाणुयंत्र चालवून तयार केलेल्या विजेचा खर्च केव्हांहि खूपच जास्त येईल. ओकरिज् येथील प्रयोगशाळेचे प्रमुख डॉ. वेनबर्ग् यांच्या अंदाजाप्रमाणें परमाणु-वीज सध्यांच्या विजेपेक्षा दुप्पट भावानें विकावी लागेल. इतर साधनांनीं वीज निर्माण करणें ज्या देशांत शक्य नसेल अशा ध्रुव प्रदेशाजवळील देशांत परमाणु-वीज कदाचित परवडूं शकेल. या विद्युत्-निर्मितीचें यंत्र जलविद्युत्-यंत्राप्रमाणें पुरवठ्याच्या ठिकाणापासून फारसें दूर ठेवावें लागणार नाहीं. त्यामुळें पुरवठ्याच्या मार्गातील बऱ्याचशा अड-चणी दूर होतील व यंत्रांत निर्माण होणाऱ्या उष्णतेचा जवळच्या कारखान्यांतून भरपूर उपयोग करतां येईल.

वाहतुकीच्या साधनांतून अिंधन म्हणून परमाणु-शक्तीचा उपयोग करतां येईल असें कल्पून नाना तऱ्हेच्या रोमांचकारी बातम्या प्रारंभींच्या काळांत वर्तमान-पत्रांतील स्तंभलेखकांनीं पिकविल्या होत्या. "पेपर-मिंटाच्या गोळीएवढ्या किरणातूनें पृथ्वीपर्यटनास पुरेल इतकी शक्ति एका मोटारीस मिळूं शकेल. किंवा उद्यांचीं विमानें व आगबोटी परमाणु-इंधनाच्या छोट्याशा गांठोड्यावर दूर दूर अंतरापर्यंत अप्रतिहत भ्रमण करतील."—अशा तऱ्हेच्या त्या बातम्या होत्या. गेल्या नऊ वर्षांत तरी निदान हा ' उद्यां ' उगविलेला नाहीं ! या प्रमाणें १९९० सालापर्यंत तरी परमाणु-शक्तीवर चालणारी आगगाडी तयार होण्याची अपेक्षा कोणी धरूं नये.

## परमाणुशक्तीवर चालणारी पाणबुडी

कोणतेंहि यंत्र ऊर्जेच्या साहाय्यानें चालवयाचें असल्यास ज्या छोट्या यंत्राचा उपयोग करतात त्याला ' मोटर ' म्हणतात. पाण्याचे पंप, पिठाच्या गिरण्या वगैरे चालविण्यासाठीं विद्युत्-मोटार बापरतात हें प्रसिद्ध आहे. त्याच धर्तीवर एक परमाणु-मोटार तयार करून त्याच्या साहाय्यानें वाहतुकीच्या साधनांचें संचलन करावें लागेल. या नव्या मोटारमध्यें किरणातु २३५ वापरून शृंखलाप्रक्रियेनें निर्माण झालेल्या उष्णतेनें पाण्याची वाफ करून त्या वाफेचा शक्त्यु-त्पादनासाठीं उपयोग करावा लागेल. या मोटारींतून निघणाऱ्या अपायकारक विकिरणांपासून वाहन-चाल-कांना व उतारूंना उपद्रव होऊं नये यासाठीं शिसें वा दुसऱ्या एखाद्या मिश्र धातूचें मोठे जाड संरक्षक आवरण तयार करणें आवश्यक होईल. त्यामुळें प्रत्यक्ष इंधनाचें ( किरणांतूचें ) वजन फारच कमी असलें










तरी या आवरणामुळें यंत्राचें एकूण वजन खूपच जास्त होईल. म्हणजे मियाँ मुठींत मावणारे पण त्यांचा झगा मात्र चार मणांचा असला प्रकार व्हायचा! शिवाय सध्या पेट्रोलवर चालणाऱ्या वाहनापेक्षां या परमाणु-वाहनांचा खर्च कमी येईल असें आजतरी म्हणतां येणार नाहीं.

बोट पाण्यांत तरंगत राहण्यासाठीं तिच्या तळाशीं वाळूचीं पोतीं घालतात. त्याला 'बॅलस्ट' म्हणतात. पण परमाणु-मोटर व त्यांचे आवरण यांचें प्रचंड वजन वाढल्यामुळें बोटींना लागणारें इंधन व वजन दोन्हींहि मिळून कदाचित् परमाणुशक्तीचा उपयोग करतां येईल. पाणबुडींत वजन कमी असावें लागतेंच. पण पाण्याच्या खालीं गेल्यानंतर ज्वलनासाठीं लागणारा प्राणवायु सांठवून ठेवणारीं पिंपें बाळगावीं लागतात. त्यामुळें वजन वाढतेंच. परमाणु-मोटर वापरल्यास प्राणवायूची जरूरी नाहीं. त्यामुळें वजन कांहीं प्रमाणांत कमी होईल व पिपांची जागा मोकळी होऊन खलाशांना वावरण्यासाठीं जास्त जागा मिळेल. याचाच विचार करून 'नॉटिलस्' नांवाची परमाणु-शक्तीवर समुद्रोदरसंचार करणारी पाणबुडी नुकतीच तयार करण्यांत आली आहे. इंधनासाठीं वा प्राणवायू-साठीं समुद्रपृष्ठावर वारंवार यावें न लागतां जास्त गतीनें ही पाणबुडी संचार करूं शकते. तात्त्विक गणि-तानें पाहिल्यास १ पौंड किरणातु वापरला तर ही पाणबुडी २४,००० मैलांचा प्रवास करूं शकेल. प्रत्यक्षांत हें मान खूपच कमी होऊं शकेल. हेंच संशोधन पुढें चालूं ठेवल्यास सारेंच समुद्रपर्यटन मोठ-मोठ्या उतारूवाहक पाणबुड्यांतून कसें करतां येईल याचा शास्त्रज्ञ सध्यां विचार करीत आहेत. समुद्र-पृष्ठावरच्या वादळ वगैरे हालचालींपासून येणारे व्यत्यय अशा प्रवासांत मुळींच येणार नाहींत. नाहींतरी मोठमोठे मासे समुद्राच्या पोटांतून हजारों मैल भ्रमण करतातच!

संरक्षक आवरणाच्या जडपणामुळें विमानांत हें यंत्र वापरणें सध्यांतरी शक्य नाहीं. 'सध्यां तरी' असें म्हणण्याचें कारण कीं, कदाचित् लवकरच आवरणा-साठीं वापरण्यांत येणाऱ्या जड धातूंच्या पत्र्याऐवजीं एखाद्या नव्या हलक्या द्रव्याचा शोध लागेल व हा वजनाचा प्रश्न चट्कन सुटूंहि शकेल. तोंपर्यंत मात्र यांत्रिक सुलभता व इंधनखर्च या दोन्हीहि दृष्टीनीं आगगाड्यांत व मोटारींत परमाणुशक्ति वापरणें असंभाव्य आहे.

याशिवाय दुसरा एक प्रश्न या संदर्भांत महत्त्वाचा आहे. त्याचा उल्लेख करणें इष्ट आहे. परमाणुयंत्रांत वापरला जाणारा किरणातु हा धातु भूगर्भांत अल्प प्रमाणांत सांपडतो. त्यामुळें सर्रहा उपयोग केल्यास त्याचा सांठा लवकरच संपुष्टांत येईल. दुसरें असें कीं, किरणातु एकदां वापरतांच दुसऱ्या स्वरूपांत जातो. व या नव्या स्वरूपांत शक्ति निर्माण करण्यासाठीं त्याचा उपयोग होणें सुतराम् अशक्य ठरतें. त्यामुळें शृंखला-प्रक्रियेला उपयुक्त होणाऱ्या दुसऱ्या एखाद्या पदार्थाची सतत निर्मिति या किरणातूपासून कशी होईल याचा गेलीं कित्येक वर्षें फार कसून शोध चालला होता त्याला नुकतेंच यश येऊं लागलें आहे. यासाठीं नव्या तऱ्हेचीं यंत्रें तयार करण्यांत आलीं आहेत. त्यांना उत्पादक यंत्रें ('ब्रीडर-रिॲक्टरस्'). असें म्हणतात. यांच्या साहाय्यानें किरणातु नष्ट होतांच त्यापासून एक नवा स-स्थानी (किरणातु २३३) व प्लुटोनियम् नांवाचा दुसरा पदार्थ निर्माण होतो. हे दोन्हीहि शृंखलाप्रक्रिया चालूं ठेवूं शकतात. त्यामुळें कालांतरानें किरणातूच्या अल्पप्रमाणाचा दोष दूर होण्याचीं सु-चिन्हें दिसूं लागलीं आहेत. हिंदुस्थानांतील त्रावण-कोरच्या भागांत सांपडणाऱ्या थोरियम् धातूपासून अशीच प्रक्रिया सुरू करतां आली तर परमाणुशक्तीचा विधायक उपयोग वाढण्याची शक्यता आहे.

## जीव वांचविणारा परमाणुस्फोट!

परमाणुयंत्रांतून निघणाऱ्या महावेगवान् क्षीणाणूं-चाहि बराच उपयोग आहे. या संबंधांत १९५१ च्या फेब्रुवारी महिन्यांत न्यूयॉर्कपासून ६५ मैलांवर अस-णाऱ्या ब्रुक्हावेन्-प्रयोगशाळेंत घडलेली एक हकीकत उद्बोधक ठरण्यासारखी आहे. एका तरुण स्त्रीच्या मेंदूंत एक गांठ झाली होती. त्यामुळें शरीर नियंत्रण करणारे कांहीं ज्ञानतंतू (नर्व्ह कॉर्ड्स) निकामी झाले होते. त्यांचा दृश्य परिणाम म्हणजे लोकांचे बोलणें समजूनहि स्वतः-च्या मानसिक प्रक्रिया ती स्त्री सुसंगत रीतीनें प्रगट करूं शकत नसे. वीसपर्यंत आंकडे मोजायला सांगितले कीं ती म्हणे, "एक, तीन, सहा, अकरा, सतरा..." तिच्या रोगावर इलाज करणारा डॉक्टर मोठा कल्पक व

घाडसी होता. त्यानें न्यष्टिजन्य (न्युक्लियर) औषधाचा प्रयोग करायचें ठरविलें. त्या स्त्रीनेंहि मोठ्या धैर्यानें या प्रयोगांत सामील होण्यास संमति दिली. ब्रुकहावेन-च्या प्रयोगशाळेंत आंतून शिशयाच्या जाड पत्र्यांनीं आच्छादिलेल्या एका कॉंक्रीटच्या तळघरांत तिला तिच्या संमतीनें नेलें. त्या तळघराच्या एका भिंतीला एक छोटेंसें गवाक्ष होतें. त्यांतून तळघराच्या बुडाशीं असणाऱ्या परमाणुयंत्रांतून येणाऱ्या महावेगी क्षीबाणूंचा, त्या स्त्रीच्या मस्तकाच्या उजव्या बाजूवर, मारा सुरू करण्यांत आला. यापूर्वीच त्या स्त्रीला बोरॉनचें एक इंजेक्शन दिलेलें होतें व तो धातु तिच्या मेंदूंतील गांठींत बरोबर जाऊन सांठेल अशी दक्षता घेतलेली होती. धातूवर आपटणाऱ्या क्षीबाणूंमुळें एक छोटासा परमाणुस्फोटच त्या गांठींत होऊन ती गांठ नष्ट व्हावी अशी डॉक्टरांची अपेक्षा होती. अपेक्षेप्रमाणें परिणाम होऊन कांहीं आठवड्यां-तच ती स्त्री सुसंगत बोलूं लागली. जीव बचाविण्या-साठीं केला गेलेला हा पहिलाच परमाणुस्फोट ! याचा अर्थ कॅन्सर-सारख्या रोगावर क्षीबाणूंचा मारा हाच रामबाण उपाय असा कोणी करूं नये, असा इशारा तिथल्या शास्त्रज्ञांनीं दिला आहे. परंतु या प्रयोगाच्या यशानें रोगनिर्मूलनाच्या अचूक साधनासाठीं अंधारांत चांचपडणाऱ्या शास्त्राज्ञांना आशेचा पहिला किरण सांपडला हें मात्र निश्चित.

परमाणुयंत्र सुरूं केल्यानंतर त्यांत निर्माण होणारीं नाना-तऱ्हेचीं तेजोद्गर द्रव्यें मात्र प्रत्यक्ष उपयोगांत आणण्यांत शास्त्रज्ञांनीं अपूर्व यश संपादन केलें आहे. नैसर्गिक व कृत्रिम या दोन्ही प्रकारचीं तेजोद्गर द्रव्यें मोठ्या प्रमाणा-वर व थोड्या खर्चांत या यंत्रांत तयार होऊं लागलीं. गेल्या नऊ वर्षांत त्यांचे असंख्य उपयोग प्रकाशांत येऊं लागले. तसेंच नव्या उपयोगांच्या कल्पनांचाहि जणूं पूरच उसळला ! एखाद्या सामान्य मूलतत्त्वाच्या न्यष्टीवर क्षीबाणूंचा मारा केला तर ती न्यष्टि अस्थिर होते, व एक नवा तेजोद्गर सस्थानी तयार होतो. सामान्य सोन्याच्या न्यष्टीचा भार १९७ असतो पण हेंच सोनें क्षीबाणूंच्या माऱ्यांत सांपडलें तर त्याचा १९८ भाराचा एक तेजोद्गर सस्थानी तयार होतो. ही सामान्य पदार्थाचें तेजोद्गर पदार्थांत रूपांतर करण्याची एक पद्धति. अशा तऱ्हेनें अनेक पद्धती संशोधित करून सर्वसामान्य पदार्थांचे तेजोद्गर सस्थानींत रूपांतर करण्यांत परमाणुयंत्राचा फारच उपयोग झालेला आहे.

### गायगर-यंत्राचा शोध

एखादें मूलतत्त्व व त्याचा तेजोद्गर सस्थानी यांत सामान्य रासायनिक प्रक्रिया व गुणधर्म या बाबतींत कांहींहि फरक नसतो. फरक असतो तो सस्थानींच्या तेजोद्गरणांतच. या सस्थानींना हुडकून काढणारें यंत्र गायगर नांवाच्या शास्त्रज्ञानें शोधून काढलें. तें इतकें नाजुक आहे कीं, अत्यंत सूक्ष्म असा तेजोद्गर सस्थानींचा अंशहि थोड्या अंतरावरून हुडकून काढून त्याच्या हालचालींची तें नोंद करूं शकतें. त्यामुळें या तेजोद्गर सस्थानींचा अन्वेषणतंत्रां-( 'ट्रेसर टेक्निक्') मध्यें फारच उपयोग होतो.

अन्वेषण-तंत्राचा उपयोग शरीरशास्त्र व वनस्पतिशास्त्र या दोहोंनांच केवळ नव्हे तर उद्योगधंद्यांनासुद्धां कांहीं किचकट क्रियाप्रक्रियांचें सत्य स्वरूप समजून घेण्या-साठीं फारच उपकारक ठरलेला आहे. मनुष्यांच्या व वनस्पतींच्या शरीरांत घडणाऱ्या वेगवेगळया रासा-यनिक क्रियांचें सम्यक् दर्शन परीक्षानलिकेंतील प्रयोगां-वरून योग्य रीतीनें कधींच होत नाहीं. त्यासाठीं प्रत्यक्ष शरीरांत शिरून त्या क्रियांचें वर्णन करणारा बातमीदार म्हणून तेजोद्गर सस्थानी अत्यंत उपयुक्त ठरतो. एखाद्या पदार्थांत तेजोद्गर सस्थानी सूक्ष्म प्रमाणांत मिसळून तें मिश्रण शरीरांत सोडून द्यावयाचें व नंतर गायगर-यंत्राच्या साहाय्यानें त्याची हालचाल व स्थित्यंतरें यांचीं नोंद करावयाची व या पद्धतीनें शरीरांतर्गत क्रियांचा अभ्यास करावयाचा, असें हें संशोधनतंत्र आहे. सामान्य पदार्थांत मिळूनमिसळून राहून त्यांच्या हाल-चालींवर हेरगिरी करणारे हे सस्थानी ज्ञानवृद्धी-साठीं मनुष्याला आतां वश झाले आहेत !

### शास्त्रीय संशोधनास अपूर्व साहाय्य

वनस्पतींची वाढ जोमानें होण्याकरितां खतें वापर-तात. पण वनस्पतींच्या मुळांभोंवतीं घातलेल्या खताचें पुढें काय होतें हे संपूर्णपणानें जाणता येत नसे. आतां त्या खतांत एखाद्या तेजोद्गर सस्थानीचा सूक्ष्म अंश मिसळून देतात, व अन्वेषणतंत्राच्या साहाय्यानें त्या खता-च्या जमिनीपासून वनस्पतींच्या शरीरांतर्गत होणाऱ्या हालचालींची नोंद करतात. यावरून खतांची उपयुक्त-








ता व कार्यकुशलता यांचा बरोबर अंदाज येऊं लागला आहे. हाडें व दांत यांच्या वाढीसाठीं कॅल्शियमचा उपयोग होतो. परंतु कोणत्या विशिष्ट स्वरूपांत संयोगित केलेला कॅल्शियम अचूकपणें व सुलभतेनें या कार्यांत यशस्वी होतो याचा शोध घेणें अगत्याचें होतें. त्यासाठीं निरनिराळ्या खाद्यपदार्थांमधून तेजोद्गर स्वरूपांतला कॅल्शियम् सूक्ष्म प्रमाणांत मिसळून तो प्राण्यांच्या शरीरांत जाऊं देतात. नंतर त्या खाद्यपदार्थांच्या शरीरांतर्गत प्रगतीचा, शोषणाचा व पचनाचा अभ्यास गायगरच्या यंत्रानें करून, वाढीला जास्त उपयोगी पडणाऱ्या कॅल्शियमयुक्त खाद्यांचा शोध लावतां येतो. उदा०, फॉस्फरस ३२, कार्बन १४, आयोडीन १३१ आणि सल्फर ३५ इत्यादि सस्थानींचा स्वतंत्र वा संयुक्त स्वरूपांत अन्वेषणतंत्राप्रमाणें उपयोग करून जीवरसायन-( बायोकेमिस्ट्री )शास्त्रांत फार मोठी भर घालण्यांत आलेली आहे. वनस्पती सूर्यप्रकाशांत हवेंतील कार्बन-डायऑक्साइडपासून कार्बन वेगळा करतात, या क्रियेचा अभ्यास या तंत्रानें सुलभ केला, एवढेंच नव्हें तर सूर्यप्रकाशाची व हिरव्या क्लोरोफिलची या क्रियेला जरूरी असतेच असें नाहीं हें नवें सत्य उजेडांत आणलें.

कांहीं सस्थानी शरीरांतर्गत प्रवास फार झपाट्यानें करतात. साध्या मिठांतून जर तोंडावाटे तेजोद्गर सोडियम् शरीरांत जाऊं दिला, तर दोन मिनिटांतच तो बोटांच्या टोकांत आलेला आढळतो. उलट, जर हेंच मीठ विलयनाच्या स्वरूपांत रक्तप्रवाहांत सोडलें तर एका मिनिटाच्या आंतच घामांतून बाहेर पडलेलें आढळतें. गाईच्या चाऱ्यांतून तेजोद्गर लोखंड जर तिच्या पोटांत जाऊं दिलें तर २४ तासांच्या आंतच तिच्या दुधांत तेजोद्गरणाचा गुणधर्म आढळतो. मनुष्याच्या शरीरांत एकूण रक्त किती ? – याचें उत्तरहि याच तंत्रानें देता येतें. शरीरांतून थोडें रक्त बाहेर काढून त्यांत तेजोद्गर फॉस्फेटचें विलयन मिसळतात. नंतर त्या रक्तांतील तेजोद्गरणाचें एकूण प्रमाण मोजून ठेवतात, व परत तेंच रक्त शरीरांत सोडतात. थोड्या वेळानंतर तेजोद्गर फॉस्फरस शरीरांतील रक्ताशीं एकरूप होऊन जातो. परत थोडें रक्त बाहेर काढून मोजतात व त्यांतील तेजोद्गरणाच्या प्रमाणावरून साध्या त्रैराशिकानें एकूण रक्ताचें प्रमाण काढतां येतें. एका विनोदी शास्त्रज्ञानें तर गोल्फचे चेंडूंत तेजोद्गर पदार्थ मिसळून ठेवला आहे. खेळाच्या भरांत जर हा चेंडू मैदानापलीकडच्या गवताळ जागेंत लुप्त झाला तर गायगरयंत्रानें तो चटदिशीं हुडकतां यावा ही त्याची कल्पना आहे !

तेजोद्गर पदार्थापासून निघणाऱ्या विकिरणांपासून शरीराला अपाय होऊं नये म्हणून त्यांचें प्रमाण वरील सर्व प्रयोगांत अतिसूक्ष्म ठेवण्यांत येतें. पण या अपायकारक विकिरणांचाहि उपाय म्हणून कांहीं वेळां उपयोग केलेला आहे. मानवी शरीराच्या क्रियांचें नियंत्रण करणारी ' थायरॉइड ' म्हणून एक ग्रंथि आहे. ती ग्रंथि शरीरांत येणारा बहुतेक सगळा आयोडिन शोषून घेते. या ग्रंथींत जर अवास्तव वाढ झाली असेल तर तें रोगाचें लक्षण ठरतें. जरा जास्त प्रमाणांत तेजोद्गर आयोडिन शरीरांत जाऊं दिला तर तो त्या ग्रंथींत शोषला जातांच विकिरणें फक्त लागेल व त्यांच्या माऱ्यानें ती रोगट वाढ नष्ट केली जाईल. अशा रीतीनें कांहीं रोगांवर बाहेरून विकिरणें सोडण्यापेक्षां त्या रोगस्थळांच्या अंतरांत कोणता पदार्थ अचूक शोषला जातो याचा शोध काढून जर त्यांत ऐखादा तेजोद्गर सस्थानी मिसळला तर रोगनिर्मूलन सुलभतेनें व अचूक रीतीनें करतां येईल. परमाणुयंत्रापासून उपलब्ध होणाऱ्या तेजोद्गर सस्थानींनीं वैद्यकशास्त्रांतील चिकित्सा, औषधयोजना व विच्छेदन या तीनहि क्षेत्रांत क्रांतिकारक माहिती मिळविण्याचीं साधनें निर्माण केलीं आहेत. औद्योगिक क्षेत्रांतहि सुताच्या गिरण्या, धातू व धातुमिश्रणें तयार करणारे कारखाने, तेलाच्या गिरण्या अशा ठिकाणीं सुद्धा पाश्चात्त्य देशांतून या अन्वेषणतंत्राच्या साहाय्यानें गुंतागुंतीच्या प्रक्रियांचें व अडचणींचें निराकरण करण्यांत आलें आहे.

निसर्गाचें व त्यांतील नानाविध क्रियांचें सूक्ष्मपणानें ज्ञान मिळवून ज्ञानाच्या मर्यादा वाढविण्याचें मौलिक कार्य शास्त्र करीत आहे. या निसर्गज्ञानाचा मानवीजीवित उत्तरोत्तर सुखी, शांततेचें व भरभराटीचें घडविण्यासाठीं जो उपयोग होण्याची शक्यता आहे त्यांत परमाणुशक्तीचा अंश किती आहे याचें दर्शन यावरून वाचकांना घडावें. मानवजातीची मनोवृत्ति संहाराकडून सेवेकडे जर कायमची वळेल तर परमाणु शक्ति म्हणजे भस्मासुर न राहता नव्या सौख्यपूर्ण सृष्टीचा विधाता विश्वामित्र ठरेल !

लो. टिळकांच्यानंतरचें एतद्विषयक संशोधन : श्री. चिं. ग. काशीकर

# ‘ सांख्यकारिकां ’तील ‘ लुप्त ’ आर्या !

प्राचीन भारतीय दर्शनशास्त्रांमध्यें सांख्यशास्त्राचें महत्त्व फार मोठें आहे. ईश्वरकृष्णविरचित ‘ **सांख्यकारिका** ’ हा सांख्यशास्त्रावरील सर्वांत प्राचीन उपलब्ध ग्रंथ असून त्यांत एकूण बहात्तर कारिका आहेत. लो० टिळकांनीं आपल्या ‘ गीतारहस्यां’त कापिल-सांख्यशास्त्राचें विवेचन करीत असतां सांख्यकारिकांपैकीं एक ‘ लुप्त ’ कारिका उपलब्ध झाल्याचें प्रतिपादन केलें. त्यांच्या मतें एकसष्टाव्या कारिकेवरील गौडपादाचार्यांचें भाष्य हें वस्तुतः दोन कारिकांवरील आहे. त्या भाष्यांतील अवशिष्ट ‘ प्रतीकें ’ एकत्र करून त्यांनीं पुढील प्रमाणें कारिका तयार केली :

‘ कारणमीश्वरमेके ब्रुवते कालं परे स्वभावं वा ।
प्रजाः कथं निर्गुणतो व्यक्तः कालः स्वभावश्च ॥ ’

याबाबतचा मजकूर ‘ गीतारहस्यां’त सांख्यप्रकरणांत आला आहे. त्यासंबंधीं विस्तृत विवेचन ‘ संस्कृत रिसर्च ’ ( ग्रं. १, भाग २, पृ. १०७-१७ ) या नियतकालिकांतील इंग्रजी लेखांत त्यांनीं केलें; आणि सदर कारिकेमध्यें ‘ ब्रुवते ’ या पदाच्या ऐवजीं ‘ पुरुषं ’ अशी दुरुस्ती केली. या लेखासंबंधीं त्या वेळीं बरीच उलटसुलट चर्चा झाली. मद्रासचे प्रा. सूर्यनारायणशास्त्री यांनीं संपादिलेल्या ‘ सांख्यकारिके’च्या आवृत्तींत ( तृतीयावृत्ति, पुनर्मुद्रण, मद्रास १९४४ ) या नव्या कारिकेवर आक्षेप घेतले आहेत. डॉ. हरदत्तशर्मा यांनीं ( अ. भा. प्राच्यविद्यापरिषद्, लाहोर अधिवेशन-वृत्तांत, भाग २, पृ. १०३०; गौडपादभाष्यासह सांख्यकारिका आवृत्ति; सांख्यतत्त्वकौमुदी आवृत्ति; इंडियन् हिस्टॉरिकल क्वार्टर्ली, व्हॉल्यूम ५, भाग ३, पृ. ४२१ – यांमधून ) त्या आक्षेपांना उत्तरें देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या मुद्यांना उत्तरें देण्यासाठीं प्रा. सूर्यनारायणशास्त्री यांनीं ‘ माठर आणि परमार्थ ’ हा लेख ( ‘ जर्नल ऑफ् दी रॉयल एशियाटिक सोसायटी ’, लंडन, १९३१ ) लिहिला. श्री. एस्. एस्. पाठक यांनींहि नव्या कारिकेसंबंधीं ( ‘ इंडियन अँटिक्वरी ’ मुंबई, व्हॉल्यूम ५२, पृ. १७७-८१ ) कांहीं शंका व्यक्त केल्या. मि. लेडूस् यांनीं ( ‘इंडियन कल्चर’, कलकत्ता, ऑक्टोबर १९३६ ) या वादांत नवीनच एक मुद्दा उपस्थित केला. ‘कपिलाय नमस्तस्मै...’ इत्यादि कारिका गौडपादभाष्य आणि माठरवृत्ति या दोहोंच्या प्रास्ताविकांत आढळते. हीच सांख्यकारिकेंतील पहिली आर्या असावी असें त्यांनीं सुचविलें. या लेखाला, तसेंच डॉ. शर्मा यांच्या प्रतिपादनाला उत्तर देण्यासाठीं प्रा. सूर्यनारायणशास्त्री यांनीं आणखी एक लेख ( ‘ सांख्यसप्ततींतील लुप्त कारिका ’ पूना ओरिएंटॅलिस्ट, व्हॉल्यूम २, नं. २, पृ. ६५-७४ ) प्रसिद्ध केला. श्री. एन्. अय्यास्वामी शास्त्री यांनीं ‘ सुवर्णसप्ततिशास्त्र ’ या नांवाचें पुस्तक १९४४ सालीं प्रसिद्ध केलें आहे. या ग्रंथांत सांख्यकारिका व त्यावर परमार्थ नांवाच्या लेखकानें चिनी भाषेंत अनुवाद केलेल्या एका टीकेचें संस्कृत रूपांतर छापलें आहे. या ग्रंथाला विस्तृत आणि विवेचक प्रस्तावनाहि त्यांनीं लिहिली आहे. तींत लो० टिळकांच्या पूर्वोक्त कारिकेसंबंधीं विचार केलेला आहे. त्यानंतर पं. उदयवीर शास्त्री नाहान ( पंजाब ) यांचा ‘ सिद्धभारतीं’त ( डॉ. सिद्धेश्वर वर्मा गौरवग्रंथ १९५० ) ‘ तिलकोपज्ञा आर्या ’ या नांवाचा संस्कृत निबंध प्रसिद्ध झाला, त्यांतहि लो० टिळकांच्या पूर्वोक्त कारिकेचा तपशीलवार विचार केला आहे. या उपरिनिर्दिष्ट साहित्याच्या आधारें या विषयाचा ऊहापोह मराठी वाचकांसाठीं येथें करण्याचा विचार आहे. अर्थात् या लेखांत माझें स्वतःचें असें प्रतिपादन फारसें नाहीं हें प्रथमच नमूद केलेलें बरें.

लो० टिळकांच्या प्रतिपादनाचा भावार्थ असा कीं ईश्वरकृष्णाच्या आर्यासप्ततीमध्यें एकूण ७२ आर्या असल्या तरी गौडपादाचार्यांचें भाष्य ६९ आर्यांवरच आहे. यावरून असें दिसतें कीं उरलेल्या तीन आर्या उपसंहारस्वरूपाच्या आहेत. मूळ ७० आर्यांपैकीं ६९ शिल्लक असल्यामुळें एक कारिका लुप्त झाली असावी.



अनुक्रमणिका






## सांख्यकारिकां'तील 'लुप्त' आर्या !

ही लुप्त कारिका ६१ व्या कारिकेच्या गौडपादभाष्यांतील प्रतीकांच्या आधारें वर दिल्याप्रमाणें तयार होते. ईश्वरास्तित्वाला ही आर्या बाधक असल्यामुळें कोणा ईश्वरास्तित्ववाद्यानें ती काढून टाकली. परंतु तिच्यावरील गौडपादीय भाष्य सुदैवानें शिल्लक राहिलें. एक कारिका लुप्त झाल्याची शंका प्रथम प्रो. विल्सननें प्रकट केली आणि त्या शंकेचा छडा लावून लो० टिळकांनीं वरील आर्या शोधिली.

वर उपस्थित केलेल्या कारिकांच्या संख्येच्या मुद्द्यासंबंधीं श्री. उदयवीरशास्त्री यांचें म्हणणें असें कीं एकूण ७२ आर्यांपैकीं ४ आर्या उपसंहारात्मक आहेत आणि ६८ आर्यांत मूळ विषय मांडला आहे. विल्सन व टिळक यांनीं ६९ व ३ अशी कारिकांची विभागणी केली ती त्यांना मान्य नाहीं. 'आर्यासप्तति' या पदाबद्दल त्यांचें म्हणणें असें कीं, 'सप्तति' (७०) हीच संख्या अभिप्रेत आहे असें मानण्याचें कारण नाहीं. बहात्तर आर्यांसाठीं 'सप्तति' हा शब्दप्रयोग केलेला असणें मुळींच अशक्य नाहीं. अशा प्रकारचीं उदाहरणें संस्कृत वाङ्मयांत पुष्कळ आढळतात. उदाहरणार्थ, अभिनवगुप्ताचार्यांच्या 'परमार्थसार' ग्रंथांत १०५ आर्या आहेत. पण तो त्याला 'आर्याशतक' असें म्हणतो. क्षेमेंद्राच्या 'पुरुषार्थशतकां'त १०५ श्लोक आहेत. गोवर्धनाचार्यांच्या 'आर्यासप्तशती' ग्रंथांत ७५६ श्लोक आहेत. त्यांपैकीं उपक्रमाचे ५४ व उपसंहाराचे ६ श्लोक आहेत. हालाच्या 'गाथा सप्तशतीं'त ७०३ श्लोक आहेत; त्यांत ६ श्लोक उपक्रमोपसंहारस्वरूपाचे आहेत. सारांश ७२ आर्यांच्या ग्रंथाला 'सप्तति' हें नांव देण्याला कांहींच प्रत्यवाय नाहीं. अर्थात् 'सप्तति' याचा सत्तर हा अर्थ ठाम समजून, प्रत्यक्षांत ६९ आर्याच शास्त्रप्रतिपादक असल्यामुळें एक आर्या लुप्त मानणें अनावश्यक आहे, असा श्री. उदयवीरशास्त्री यांचा पहिला मुद्दा आहे.

परंतु परमार्थाच्या 'सांख्यकारिके'वरील भाष्याच्या चिनी भाषांतरावरून हा बहिरंगपरीक्षणाचा मुद्दा निकालांत निघतो. परमार्थ हा उज्जयिनी येथील बौद्ध भिक्षु होता व त्यानें इ. स. ५४६ मध्यें सांख्यकारिका व त्यांवरील संस्कृत भाष्य यांचें चिनी भाषांतर केलें. या भाषांतराला आधारभूत संस्कृत भाष्य कोणतें होतें हा एक प्रश्न आहे. 'अनुयोगद्वारसूत्र' या इ. स. ४५० च्या सुमारास लिहिलेल्या जैन ग्रंथामध्यें माठरभाष्य या नांवाच्या सांख्यकारिकेवरील भाष्याचा उल्लेख मिळतो. ज्या अर्थी एक सुप्रतिष्ठित भाष्य म्हणून जैन ग्रंथांत त्याचा उल्लेख आला त्या अर्थी त्या ग्रंथाच्या साधारणतः शंभर वर्षें अगोदर हें भाष्य रचलें गेलें असावें, असा अंदाज करण्यास कांहींच हरकत नाहीं. म्हणजे त्याचा रचनाकाल इ. स. ३५० हा येतो. सांख्यकारिकांवरील सर्वांत प्राचीन भाष्य हेंच असलें पाहिजे. कारण सांख्यकारिकांचा कर्ता ईश्वरकृष्ण याचा काल ३०० असा आहे. हें माठरभाष्य आजतागायत अनुपलब्ध आहे. या भाष्याचा अनुवाद म्हणजेच परमार्थाचें चिनी भाषांतर होय असें मानण्यास जागा आहे.

परमार्थाच्या चिनी भाषांतराचे संपादक पं. अय्यास्वामी शास्त्री यांनीं असें म्हटलें आहे कीं, परमार्थाच्या भाषांतरावरून पाहातां ईश्वरकृष्णानें नेमक्या सत्तरच कारिका रचल्या असें मानावें लागतें. वसुबंधु या नांवाचा ईश्वरकृष्णाचा समकालीन पंडित होता. त्याच्या चरित्रांत असें स्वच्छ लिहिलें आहे कीं, ईश्वरकृष्णाच्या 'सुवर्णसप्तती'चें खंडन करण्यासाठीं वसुबंधूनें 'परमार्थसप्तति' नांवाचा ग्रंथ लिहिला. आणि त्यांत तितक्याच म्हणजे सत्तर कारिका रचल्या. 'रूपैः सप्तभिरेवं' ही ६३ वी कारिका परमार्थाच्या ग्रंथांत मुळींच नाहीं. अर्थात् परमार्थाच्या काळानंतर कोणीं तरी ती नवीन बनवून घातली असावी. सांख्यसूत्र व गौडपादभाष्य यांत ही कारिका असल्यामुळें तिचा अनुवाद न करण्यांत परमार्थाची चूक झाली असें प्रो. टककुस् यांनीं म्हटलें आहे व त्याचाच अनुवाद लो० टिळकांनीं केला आहे. परंतु परमार्थाचा काळ गौडपादाच्या पूर्वीचा असल्यामुळें हें म्हणणें निर्मूल ठरतें. शिवाय त्या कारिकेंत फारसें नवीन प्रतिपादन नाहीं; ६२ व्या कारिकेनंतर ६४ वी कारिका वाचल्यानें संगतीहि बिघडत नाहीं. किंबहुना ६४ व्या कारिकेंतील 'एक' हें पद ६२ व्या कारिकेला उद्देशूनच वापरलेलें आहे. कारिका ४४ व ४५ यांत जें सप्तविध प्रकृतीचें प्रतिपादन केलें आहे तेंच संक्षिप्त रूपांत ६३ व्या कारिकेंत सांगितलें आहे. सत्तर कारिकांच्या या लहानशा शास्त्रग्रंथांत अशी पुनरुक्ति खास समर्थनीय ठरणार नाहीं. त्याचप्रमाणें ७१ वी आर्या कोणी तरी 'मेधावी'










पुरुषानें रचून सांख्यकारिकांमध्यें घातली असें खुद्द परमार्थानेंच म्हटलें आहे. म्हणजे सांख्यकारिका चीनमध्यें जाण्यापूर्वी ती कोणीं तरी रचून घातली असली पाहिजे. पं. अय्यास्वामी शास्त्री यांची अशी कल्पना आहे कीं ७१ व्या कारिकेची रचना पाहतां तिच्या कर्त्याला 'षष्टितंत्र' या लुप्त सांख्य-ग्रंथाची साक्षात् माहिती असावी, आणि अर्थात् सांख्यकारिकांच्या भाष्यकारानें स्वतः ती रचली असावी. सारांश, सत्तर या कारिकासंख्येच्या मोघम अर्थाविषयीं पं० उदयवीर शास्त्री यांनी जो युक्तिवाद मांडला आहे तो परमार्थाच्या चिनी भाषांतरावरून पाहतां पोकळ ठरतो; परंतु त्याचबरोबर ईश्वरकृष्णानें सत्तरच कारिका रचल्या हें सिद्ध होत असल्यामुळें एक आर्या लुप्त मानून तिची पूर्ति करण्याची आवश्यकताहि उरत नाहीं.

ज्या एकसष्टाव्या कारिकेच्या भाष्यांतून लो. टिळकांनीं नवी कारिका बनविली ती पुढील प्रमाणें आहे :

'प्रकृतेः सुकुमारतरं न किंचिदस्तीति मे मतिर्भवति।
या दृष्टास्मीति पुनर्न दर्शनमुपैति पुरुषस्य ॥'

या कारिकेवरील गौडपादभाष्याचा आरंभींचा आणि शेवटचा भाग येथें उद्धृत करणें जरूर आहे. आरंभींचा भाग असा आहे : "लोके प्रकृतेः सुकुमारतरं न किंचिदस्तीत्येवं मे मतिर्भवति येन परार्थ एवं मतिरुत्पन्ना । कस्मात् । अहमनेन पुरुषेण दृष्टास्मीत्यस्य पुंसः पुनर्दर्शनं नोपैति, पुरुषस्यादर्शनमुपयातीत्यर्थः । तत्र सुकुमारतरं वर्णयति । केचित् ईश्वरं कारणं ब्रुवते । अज्ञो जन्तुरनीशोऽयम्... इ० " शेवटचा भाग असा आहे : "तस्मात् प्रकृतिरेव कारणं, न प्रकृतेः कारणान्तरमस्तीति । न पुनर्दर्शनमुपयाति पुरुषस्य । अतः प्रकृतेः सुकुमारतरं सुभोग्यतरं न किंचिदीश्वरादिकारणमस्तीति मे मतिर्भवति ॥" या दोन भागांच्या मध्यें जो भाष्यभाग आहे त्यांमध्यें, कांहीं लोक ईश्वर, स्वभाव किंवा काल यांना सृष्टीचें कारण मानतात, या गोष्टीचें प्रतिपादन आहे. हें प्रतिपादन 'स्वभावमेके कवयो वदन्ति' या 'श्वेताश्वतरउपनिषदां'-तील मंत्रांत आढळतें.

प्रो० सूर्यनारायणशास्त्री यांनीं मांडलेला [सांख्यका० पृ. १०५-६ टिप्पणी] मुख्य मुद्दा असा आहे कीं ज्या अर्थी 'सुकुमारतर' या शब्दाचा विचार भाष्याच्या शेवटीं पुनः आला आहे, त्या अर्थीं या भाष्यामध्यें एखाद्या अधिक कारिकेचें भाष्य शिरलें असण्याची शक्यता नाहीं. यावर डॉ. हरदत्त शर्मा यांनीं असें सुचविलें आहे कीं भाष्याच्या शेवटीं आलेलें 'न पुनर्दर्शनमुपयाति पुरुषस्य' हें वाक्य आरंभींच्या 'तत्र सुकुमारतरं वर्णयति' या वाक्याच्या पुढें वाचावें. कारण 'सुकुमारतरं वर्णयति' या वाक्याच्या पुढें 'केचिदीश्वरं कारणं ब्रुवते' इत्यादि भाग अप्रस्तुत आहे. 'ईश्वर, स्वभाव इत्यादि सृष्टीचें कारण आहे' इत्यादि प्रतिपादन हें प्रकृतीच्या सुकुमारतरत्वाचें वर्णन होऊं शकत नाहीं. कोणातरी ईश्वरवाद्यानें बुद्ध्या ही कारिका काढून टाकली आणि दुसऱ्या कोणी निर्बुद्ध मनुष्यानें हें अधांतरीं असणारें भाष्य ६१ व्या कारिकेच्या भाष्यांत कसेंतरी घुसडलें आणि 'न पुनर्दर्शनमुपयाति पुरुषस्य' या वाक्याची संगति लावण्यासाठीं त्याच्यापुढें 'अतः प्रकृतेः सुकुमारतरं' इत्यादि अनर्थक वाक्य पदरचें घातलें. माठरवृत्तींतहि असाच गोंधळ आहे. अर्थात् वाचस्पत्यादि टीकाकारांच्या पूर्वी ही कारिका लुप्त झाली असावी. 'कारिका बुद्ध्या काढून टाकली तर तिच्यामधील भाष्य कसें राहिलें ?' या प्रो० सूर्यनारायणशास्त्री यांच्या आक्षेपाला डॉ. शर्मा यांचें उत्तर असें आहे कीं, कारिका लुप्त झाली म्हणून भाष्य लुप्त व्हावयास पाहिजे असा नियम नाहीं. कारिका काढून टाकणाराच्या नजरेंत भाष्य आलें नसावें. ज्या हस्तलिखितांत भाष्य लिहिलेलें असतें त्यांत मूळ ग्रंथ लिहिलेला असतोच असें नाहीं.

याप्रमाणें लो० टिळकांच्या नव्या आर्येचें समर्थन केल्यानंतर डॉ. शर्मा यांनीं स्वतः तींत दुरुस्ती सुचविली आहे. ज्या गौडपादभाष्यांतील प्रतीकांवरून ही आर्या बनविली त्यामध्यें ईश्वरादिकांच्या बरोबर पुरुषाचाहि निर्देश केला आहे. ("निर्गुणत्वादीश्वरस्य कथं सगुणाः प्रजाः जायेरन् । कथं वा पुरुषान्निर्गुणादेव । ... अनेन पुरुषो व्याख्यातः ").

स्वभाव आणि ईश्वर यांबरोबर पुरुषाचा उल्लेख 'माठरवृत्तीं'तहि आला आहे. ('इह सांख्ये पुरुषेश्वरस्वभावा न कारणम्'). 'जयमंगला' नांवाच्या सांख्यकारिकेवरील टीकेंतहि वरील तीन कारणांचा निर्देश आहे. 'माठरवृत्तीं'त काल हें आणखी एक कारण दाखविलें आहे. सांख्यकारिकेंतील हें विवरण 'श्वेता-








श्वतर-उपनिषदां'तील 'स्वभावमेके कवयो वदन्ति' ...या, त्याचप्रमाणें ' कालः स्वभावो नियतिर्यदृच्छा...' या मंत्रांवरें आधारलेलें दिसतें. तेव्हां गौडपादभाष्यांत आणि इतर भाष्यांतहि ईश्वराबरोबर पुरुषाचाहि निर्देश असल्यामुळें ( नव्या ) कारिकेंतहि 'पुरुष' हें पद असावयास पाहिजे, असें समजून कारिकेंतील 'व्रुवते' पदाच्या स्थानीं 'पुरुषं' हें पद ( टिळकांनीं अगोदरच सुचविलें आहे हें लक्षांत न घेतां ) त्यांनीं सुचविलें आहे ( कारणमीश्वरमेके पुरुषं कालं... ).

प्रस्तुत आर्येचें समर्थन करण्यासाठीं डॉ. शर्मा यांना आपल्या कल्पनाशक्तीला बराच ताण द्यावा लागला आहे. ' न पुनर्दर्शनमुपयाति पुरुषस्य ' हें भाष्यांतील शेवटचें वाक्य आरंभीं ओढणें, ' अतः प्रकृतेः सुकुमारतरं ' इत्यादि वाक्य प्रक्षिप्त मानणें या गोष्टी करण्याला ते मानतात तितका आधार नाहीं. गौडपादभाष्यांत ही भानगड झाली असें क्षणभर वादासाठीं गृहीत धरलें तरी 'जयमंगला' टीकेंत आणि माठरवृत्तींतहि तोच प्रकार कां व्हावा ? याचा अर्थ इतकाच कीं ६१ व्या कारिकेवरील भाष्यांत ते मानतात तसा गोंधळ नाहीं. या भाष्यांत त्रिगुणात्मक प्रकृतीचें जगन्मूलकारणत्व किंवा जगदुपादानकारणत्व सिद्ध करण्याकरितां ईश्वरादिकांना जगदुपादान मानण्याच्या कल्पनेचें खंडन केलें आहे. सांख्यमताप्रमाणें ईश्वर हा विश्वाचें उपादानकारण होऊं शकत नाहीं, प्रकृति हीच जगाचें मूल कारण आहे – हें दाखविण्याकरितां तिच्या सुकुमारत्वाचें प्रतिपादन केलें आहे. आणि याच मुद्द्याचा विस्तार गौडपादभाष्यांत केला आहे. ईश्वरादि पदार्थ सृष्टीचें उपादानकारण मानल्यास प्रकृतीच्या सुकुमारत्वाला बाध येईल. परपुरुषाचें दर्शन होतांच पुनः आपण त्याच्या दृष्टीस पडूं नये यासाठीं जपणाऱ्या कुलवधूप्रमाणें प्रकृति ही पुरुषाचें दर्शन टाळणारी आहे, ईश्वरादिकांना सृष्टीचें उपादानकारण मानल्यास तिची ही प्रवृत्ति टिकूं शकत नाहीं, हें प्रतिपादण्याकरितां भाष्यकारांनीं ईश्वरादि उपादानकारणांचा प्रतिषेध केला आहे. अर्थात् ही सर्व मांडणी कारिकेंतील ' सुकुमारतरं ' या पदाच्या विवरणासाठीं आहे. गौडपादभाष्यांत कोणत्याहि प्रकारें फेरबदल झाले नसून तें मूल स्थितींत कायम आहे. याला दुजोरा देणारा खात्रीलायक पुरावा परमार्थाच्या चिनी भाषांतरित टीकेंतहि मिळतो. ही टीका आणि गौडपादभाष्य यांच्या रचनेंत अतिशय सादृश्य आहे. ईश्वर, स्वभाव, पुरुष आणि काल या चारहि कारणांचा प्रपंच येथें केला आहे. एवढेंच नव्हे, तर ज्या वाक्यानें टीकेला प्रारंभ केला ( " अत्यन्तं सुकुमारा प्रकृतिः मे मतिर्न पुनः किंचिद्वस्तु ततः सुकुमारतरमिति " ) तेंच वाक्य या चारी कारणांचें खंडन केल्यानंतर उपसंहाररूपानें आलें आहे ( " अत उक्तं, अत्यन्तं सुकुमारा प्रकृतिः मे मतिर्न पुनः किंचिद्वस्तु ततः सुकुमारतरमिति " ). तात्पर्य, डॉ. शर्मांनीं केलेलें नव्या कारिकेचें समर्थन समर्थनीय नाहीं.

सांख्यकारिकांचें वेदान्ती दृष्टीनें प्रतिपादन करूं इच्छिणाऱ्या कोणी टीकाकारानें ही कारिका काढून टाकली आणि हा उद्योग सांख्यकारिकांचें चिनी भाषेंत भाषांतर होण्यापूर्वीच झाला असला, टिळकांनीं म्हटलें आहे. परंतु चिनी भाषांतरांत वेदान्ती मताचा अंशहि आढळत नाहीं असें पं. अय्यास्वामींनीं नमूद केलें आहे. वेदांताची छटा चिनी भाषांतरांत आढळत नाहीं, एवढेंच नव्हे तर गौडपादभाष्यांतहि ती दिसत नाहीं. इ. स. १००० नंतर लिहिलेल्या ' माठरवृत्तीं'त मात्र ती दिसते. ईश्वरकृष्णाला अभिप्रेत असलेलें निरीश्वरवादित्व सिद्ध करण्यासाठीं टिळकांनीं कारिकेंत ईश्वर या पदाचा समावेश केला. गौड-

१ हा दुसरा मंत्र ' नारदपरिव्राजकोपनिषदां'त असल्याचें डॉ० शर्मांनीं म्हटलें आहे. परंतु 'श्वेताश्वतर–उपनिषदां'तहि तो आहे. वैद्य शं. गं. वर्तक यांनीं दहा वर्षांपूर्वी पुण्याच्या ' आयुर्विद्या ' मासिकांत ( एप्रिल १९४१, पृ. ३३६–४० ) लिहिलेल्या ' आयुर्वेदांतील तत्त्वज्ञान ' या लेखांत लो० टिळकांच्या नव्या आर्येचा सुश्रुतसंहिता या आयुर्वेदीय ग्रंथांतील एका श्लोकाशीं साम्य दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. तो श्लोक असा : " स्वभावमीश्वरं कालं यदृच्छां नियतिं तथा । परिमाणं च मन्यन्ते प्रकृतिं पृथुदर्शिनः ॥ " ( शारीर. १-११ ) वस्तुतः या श्लोकाचें ' श्वेताश्वतरोपनिषदांत वर उद्धृत केलेल्या मंत्रांशीं सादृश्य आहे. सांख्यांच्या अष्टविधा प्रकृतीपेक्षां श्वेताश्वतरोपनिषदांतील वर्णन केलेल्या जगत्कारणांच्या अनुरोधानें षड्विधा प्रकृति मानणें तत्कालीन आयुर्वेदीयांना सयुक्तिक वाटलें एवढेंच याबाबत म्हणतां येईल.










पादभाष्यांत ईश्वरादिकांबरोबर पुरुषाचाहि निर्देश असल्यामुळें कारिकेमध्यें पुरुष हें पदहि त्यांनीं मागाहून स्वीकारलें. परंतु त्यामुळें ईश्वरकृष्ण हा अपुरुषवादी होता असें म्हणण्याची आपत्ति येते !

अर्थसंगतीच्या दृष्टीनेंहि विचार केल्यास नवी कारिका बनविणें अप्रस्तुत ठरतें. कारिका ५६ ते ६२ मध्यें प्रकृतीचें स्वरूपकथन केलें आहे. मध्येंच ६१ व्या कारिकेच्या पुढें ईश्वरादिकांच्या जगत्कारणत्वाचा पूर्वपक्ष मांडणें अप्रासंगिक ठरतें. शिवाय ५६ ते ६१ या कारिकांतील विचारसरणीचा उपसंहार ६२ व्या कारिकेंत ' तस्मात् ' या पदानें करण्याचा हेतु, मध्येंच एक निराळा विषय मांडल्यास, विफल होतो.

या अंतरंगपरीक्षणाबरोबरचें एक मूलगामी शंका मनामध्यें येते. ती अशी कीं, ६१ व्या कारिकेवरील गौडपादभाष्यांत खरोखरीच अशीं ' प्रतीकें ' आढळतात काय, कीं ज्यांच्या साहाय्यानें नवी कारिका बनूं शकेल ? सर्व संस्कृत टीकाकारांची प्रायः अशी पद्धति असते कीं मूल ग्रंथांतील एक किंवा अनेक पदें आवश्यक त्या क्रमानें जशींच्या तशीं उद्धृत करावयाचीं आणि त्यांचें प्रतिशब्द देऊन अथवा अन्यप्रकारें स्पष्टीकरण करावयाचें. सांख्यकारिकांवरील गौडपादभाष्यांत हीच पद्धति सर्वत्र अवलंबिलेली आढळून येतें. डॉ० शर्मा यांनीं आपल्या आवृत्तींत हीं प्रतीकें स्पष्टपणें नजरेंत भरावीं म्हणून मुद्दाम जाड टाईपांत छापलीं आहेत. ज्या भाष्यांशांतून प्रतीकें शोधून काढलीं आहेत तो बारकाईनें तपासला तर त्यांत नव्या कारिकेपैकीं ' एके ' ' पुरुषं ' ' कालं ' ' परे ' ' स्वभावं ' ' वा ' ' निर्गुणतो ' ' च ' इतकीं म्हणजे निम्मी पदें मिळतच नाहींत; मग त्यांचें व्याख्यान दूरच ! नव्या कारिकेमध्यें ईश्वर, पुरुष, काल आणि स्वभाव असा क्रम बसविला आहे. परंतु भाष्यांत ईश्वर, स्वभाव, पुरुष आणि काल अशा क्रमानें त्यांचें विवरण केलें आहे. अशी क्रमविसंगति टीकाकारांच्या हातून प्रायः घडणार नाहीं. तात्पर्य, गौडपादभाष्याच्या सरणीची कसोटी प्रस्तुत भाष्यांशाला लावल्यास नवी कारिका बनूं शकत नाहीं.

टिळकांच्या नव्या कारिकेंत एक छंदोविषयक दोष पं. उदयवीर शास्त्री यांनीं दाखविला आहे. सांख्यकारिका आर्यावृत्तांत रचल्या आहेत. या वृत्तांत एक, तीन, पांच इत्यादि विषमगणांत ' ज 'गण कधींहि नसतो असा नियम आहे. सांख्यकारिकांमध्यें सर्वत्र तो कटाक्षानें पाळलेला आढळतो. लो० टिळकांच्या नव्या कारिकेच्या तिसऱ्या चरणांत ' प्रजाः क ' या अक्षरांचा पहिला गण हा ' ज ' गण आहे. अशा प्रकारचा दोष ईश्वरकृष्णाच्या रचनेंत आढळणें शक्य नसल्यामुळें ही आर्या ईश्वरकृष्णानें रचलेली नसावी असें सिद्ध होतें.

सारांश, सांख्यकारिकांच्या संख्येचें विवेचन आणि ६१ व्या कारिकेच्या ज्या भाष्यावरुन नवीन आर्या रचण्यांत आली त्या भाष्याचें परीक्षण या दोन्ही दृष्टींनीं पहातां ईश्वरकृष्णानें रचलेल्या एका आर्येचा लोप झाला असें मानतां येत नाहीं आणि अर्थातच हरवलेली आर्या शोधण्याचा प्रयत्न अयुक्त ठरतो.

---

## प्रेत !

थडग्यामधलें प्रेत हांसलें–
– मिस्किल्, झटकित काळी माती !
ढासळले अन् दगड भराभर
हादरली धरणीची छाती !

हलक्या हातें होतें रचिलें
युगायुगांचें शिल्प मनोहर,
त्यावरतीं अन् रेखियलेलें
होतें निळसर फूल मृदुलतर !

' व्यर्थेत जळुनी हिरा जाहला
हृदयामधला आज कोळसा '
वेडी पृथ्वी नाच नाचली
तिनें शोधिला त्यांत दिलासा !

सडलें प्रेत परंतु ओठीं
पुष्पांची ती सुरभित भाषा,
भव्यत्वाची, दिव्यत्वाची
मनांत होती वेडी आशा !

परन्तु क्वचित उठला मुडदा–
–विस्मृतींतला, झटकित माती !
ढासळले अन् दगड भराभर
दुभंगली धरणीची छाती !

— प्रद्युम्न टंकसाळी








डॉ. कॅस्ट्रो यांचा नवीन दृष्टिकोन ! : प्रा. वि. म. दांडेकर

# अन्नटंचाई व लोकसंख्येच्या वाढीचा प्रश्न

'नवभारता'च्या नोव्हेंबर १९५३ च्या अंकांत याच मथळयाखालीं एक लेख लिहून डॉ. रा. अ. करंदीकर यांनीं डॉ. जोसू द. कॅस्ट्रो यांच्या १९५२ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'Geography of Hunger' या पुस्तकाचा परिचय परामर्श करून दिला होता. डॉ. कॅस्ट्रो यांच्या या पुस्तकाचा मुख्य दावा असा कीं वाढत्या लोकसंख्येमुळें अन्नाची कमतरता उत्पन्न होते, हें खरें नाहीं. उलट, अन्नाच्या कमतरतेनेंच लोकसंख्येची वाढ अधिक झपाट्यानें होते. म्हणजे अन्नटंचाई व लोकसंख्येची वाढ यांचा कार्यकारणसंबंध सामान्यपणें समजतात तसा नसून नेमका त्याच्या उलट आहे. त्यामुळें त्यांच्या मतें लोकसंख्येची वाढ आवरून धरण्याकरितां कुटुंबनियोजन किंवा संततिनियमन हे मार्ग नसून अन्नाचें उत्पादन अनेक पटींनीं वाढवून सर्वांस मुबलक आणि सकस अन्न खाण्यास मिळण्याची व्यवस्था करणें हाच एकमेव मार्ग आहे. डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या पुस्तकांत जगाच्या निरनिराळया भागांत अन्नटंचाईचीं आणि उपासमारीचीं काय कारणें आहेत आणि तीं नाहींशीं करून अन्नाची सुबत्ता करण्याकरतां काय करावयास हवें यासंबंधीं सविस्तर चर्चा केली आहे. याचा गोषवारा डॉ. करंदीकरांनीं आपल्या लेखांत दिला आहेच. प्रस्तुत लेखांत डॉ. कॅस्ट्रो यांचा जो मूलभूत सिद्धान्त कीं अन्नाच्या कमतरतेनें लोकसंख्या अधिक वेगानें वाढते किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर अन्नाच्या कमतरतेनें माणसाची प्रजोत्पादनशक्ति प्रखर होते आणि त्याच्या उलट म्हणजे सकस अन्नाच्या समृद्धीनें ती मंदावते, या सिद्धांताचा आणि तो सिद्ध करण्याकरतां डॉ. कॅस्ट्रो यांनीं पुढें मांडलेल्या पुराव्याचा जरा विस्तारानें विचार करावयाचा आहे.

उपासमारीचे अनेक प्रकार करतां येतील. विषयमांडणीकरतां डॉ. कॅस्ट्रो यांनीं मुख्यतः दोन प्रकार कल्पिले आहेत. एक म्हणजे नैमित्तिक (Acute) उपासमार आणि दुसरी नित्याची (Chronic) उपासमार. नैमित्तिक उपासमार म्हणजे थोड्यामुदतीची तात्पुरती झालेली उपासमार. जशी आपण उपवास करतो तेव्हां होते ती किंवा दुष्काळ इत्यादि परिस्थितींत लोकांची थोडा काळ होते ती उपासमार. नित्याची उपासमार म्हणजे गोरगरिबांची कायमची होत असते ती उपासमार. त्यांत दिवसानुदिवस प्रत्यक्ष अर्धपोटीं रहाण्याचा प्रकारहि असेल किंवा वरवर जरी पोटभर जेवण होत असलें तरी खाल्लें जाणारें अन्न पुरेसें सकस नसल्यानें शरीरास आवश्यक ते अन्नघटक न मिळाल्यामुळें होणारी उपासमारहि असूं शकेल. उपासमारीचे नैमित्तिक आणि नित्य असे दोन प्रकार केल्यानंतर डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं माणसाच्या प्रजोत्पादनशक्तीवर या दोनहि प्रकारच्या उपासमारीचे होणारे परिणाम अगदी वेगवेगळया प्रकारचे आहेत.

नैमित्तिक उपासमारीनें म्हणजेच प्राण्याचें अन्न बरेंच कमी करून त्यास कांहीं काळपर्यंत अर्धपोटीं ठेवल्यानें त्याची विषयवासना आणि प्रजोत्पादनशक्ति या दोनहि कमी होतात असा अनुभव आहे. याला पुरावा म्हणून डॉ. कॅस्ट्रो यांनीं अमेरिकेंतील मिनेसोटा विद्यापीठाचे डॉ. ॲन्सेल आणि त्यांचे सहकारी यांनीं केलेल्या कांहीं प्रयोगांची साक्ष दिली आहे. सदर डॉक्टरमजकुरांनीं आपल्या विद्यार्थ्यांवर उपासमारीचा प्रयोग अर्थातच त्यांच्या संमतीनें केल्याचें सांगितलें आहे. हा प्रयोग सहा महिने चालू होता. या अवधींत हे विद्यार्थी अर्धपोटीं रहात म्हणजे बहुधा रात्रंदिवस त्यांची अवस्था भुकेलेली असे. अशा परिस्थितींत असें आढळून आलें कीं त्यांची विषयवासना कमी होत जाऊन सहा महिन्यांच्या अवधींत बहुतेक सर्व विद्यार्थ्यांत ती पूर्णपणें नाहींशी झाली. अशाच तऱ्हेचे परिणाम कर्नल यूजेन जेकब यांनीं जपानांतील युद्धकैद्यांच्या छावणींत आढळून



अनुक्रमणिका






आल्याचें नमूद केलें आहे. कर्नलसाहेब स्वतः युद्ध-कैद्यांबरोबर अडतीस महिने होते आणि या अवधींत उपासमारीमुळें बहुतेक सर्व युद्धकैद्यांतील विषयवासना झपाट्यानें आणि पूर्णपणें नष्ट झाल्याचें त्यांनीं म्हटलें आहे.

नैमित्तिक उपासमारीनें माणसाच्या विषयवासनेवर आणि प्रजोत्पादनशक्तीवर होणाऱ्या या परिणामांची कारणमीमांसा डॉ. कॅस्ट्रो यांनीं पुढीलप्रमाणें केली आहे : एक तर उपासमारीमुळें माणसाचें सर्व लक्ष अन्नावर खिळलेलें असतें आणि त्याला रात्रंदिवस अन्नाचा ध्यास लागलेला असतो. त्यामुळें इतरत्र त्याचें लक्ष लागत नाहीं. दुसरें असें कीं उपासमारीनें शरीराच्या सर्व इंद्रियांबरोबरच जननेंद्रियें आणि विशेषतः त्यांतील ग्रंथींचीहि उपासमार होते. त्यामुळें विषयवासना उत्पन्न करणाऱ्या 'होर्मोन्स'चें उत्पादन कमी पडतें आणि विषयवासना मंदावते. पुरुषबीजांचें भरपूर आणि स्त्रीअंडांचें नियमित उत्पादन 'हार्मोन्स'वर अवलंबून असल्यानें या हार्मोन्सचें प्रमाण जसें कमी पडेल तसें त्या मानानें पुरुषबीजांचें उत्पादन कमी आणि स्त्रीअंडांचें उत्पादन अनियमित होऊं लागतें. डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं पहिल्या महायुद्धानंतर रशियांत पडलेल्या दुष्काळांत पुरुषबीजांचें उत्पादन पूर्णपणें बंद झाल्यानें वीर्य सर्वस्वीं निर्जीव झालेल्या अनेक पुरुषांचीं, तसेंच मासिक पाळी अवेळीं बंद झालेल्या अनेक स्त्रियांचीं उदाहरणें नमूद आहेत. उपासमारीनें हार्मोन्सचें उत्पादन कमी झाल्यानें होणाऱ्या परिणामासंबंधीं डॉ. कॅस्ट्रो पुढें म्हणतात कीं उपासमारीनें पुरुषाचीं जननेंद्रियजन्य 'हार्मोन्स' इतकीं कमी होतात कीं पुरुषाची विषयवासना तर कमी होतेच पण पुष्कळदां पुरुषामध्यें स्त्रीत्वाचीं दुय्यम लक्षणें दृष्टोत्पत्तीस येतात. उदाहरणार्थ, लांब मुदतीच्या उपवासानें वा उपासमारीनें दाढीमिशयांचे केंस गळणें, सर्वांगावरची कांतडी स्त्रियांच्या कांतडीप्रमाणें मऊ नाजूक होणें आणि कधीं कधीं तर स्तनहि मोठे होऊं लागल्याचीं उदाहरणें आहेत. हीं उदाहरणें पहातां डॉ. कॅस्ट्रो म्हणतातः "मला तर पुष्कळदां असें वाटतें कीं चिनी लोकांच्या चेहऱ्यावरील तुरळक दाढी-मिशी आणि त्यांची एकंदरींत मऊ आणि नाजूक कांतडी हीं सर्व चीनवर वरचेवर येणाऱ्या दुष्काळादि आपत्तीनें होणाऱ्या उपासमारीचे तर परिणाम नसावेत ?"

नैमित्तिक उपासमारीचे विषयवासना आणि प्रजोत्पादनशक्तीवर होणारे परिणाम अशा तऱ्हेचे आहेत. नित्याच्या उपासमारीचे किंवा निकृष्ट अन्नाचे परिणाम याच्या उलट आहेत. नैमित्तिक उपासमारीनें माणसाची विषयवासना आणि प्रजोत्पादनशक्ति कमी होतात. उलट नित्याची उपासमार आणि निकृष्ट अन्न यांनीं विषयवासना प्रबळ होऊन प्रजोत्पादनशक्ति जोरावलेली आढळते. नित्याच्या उपासमारीनें होणारे हे परिणाम शारीरिक तसेच मानसिकहि आहेत.

पैकीं शारीरिक परिणाम स्पष्ट करण्याकरितां डॉ. कॅस्ट्रो यांनीं प्राणिशास्त्रांतील उदाहरणें घेतलीं आहेत. उदाहरणार्थ ते म्हणतात : "प्रत्येक गवळयास हें माहीत असतें कीं जादा पोसून लठ्ठ झालेल्या गाईम्हशी लवकर गाभण रहात नाहींत. उलट कमी पोसून सडपातळ राहिलेलीं जनावरें लवकर गाभण रहातात." सकस अन्नाचा प्रजोत्पादनशक्तीवर होणारा परिणाम स्पष्ट करून सांगण्याकरतां त्यांनीं डॉ. स्लोनाकर यांनीं केलेल्या उंदरांवरील प्रयोगांची माहिती सांगितली आहे. ते म्हणतात : "डॉ. स्लोनाकर यांनीं उंदराच्या तीन गटांना निरनिराळया अन्नावर वाढवून त्यांच्या सहा पिढ्यांचें निरीक्षण केलें आहे. एका गटाच्या अन्नांत प्रोटीनसत्त्वें केवळ १० टक्केच होतीं. दुसऱ्या दोन गटांत तीं अनुक्रमें १८ आणि २२ टक्के होतीं. या अन्नाचा परिणाम पहा : पहिल्या गटांत ५ टक्के नर आणि ६ टक्के माद्या वांझ आणि निर्वंश निघाल्या. दुसऱ्या गटांत वांझपणाचें प्रमाण नरांत २२ टक्के आणि माद्यांत २३ टक्के होतें; आणि तिसऱ्या गटांत तें अनुक्रमें ४० टक्के आणि ३८ टक्के होतें. जरा वेगळया रीतीनें पाहिलें तर पहिल्या गटांतील उंदरांना सरासरीनें २३·३ पिल्लें झालीं. ही सरासरी दुसऱ्या आणि तिसऱ्या गटांत अनुक्रमें १७·४ आणि १३·८ च होती. यावरून हें उघड आहे कीं अन्नांतील प्रोटीनचें प्रमाण जसें अधिक असेल त्या मानानें प्राण्यांची प्रजोत्पादनशक्ति कमी होते.

हें असें कां होत असावें याची मीमांसा करतांना डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं प्रोटीनचा भरपूर पुरवठा होत असतांना जी संतति होते ती रोगराईचा प्रतिकार कर-








ण्यास समर्थ असते आणि त्यामुळें तींत बालमृत्यूंचें प्रमाण कमी असतें. उलट, प्रोटीनची उणीव असलेल्या अन्नानें झालेली संतति ही दुबळी निपजते आणि तींत मृत्यूचें प्रमाण अधिक असतें. अशा परिस्थितींत निसर्गाची योजनाच अशी दिसते कीं दुबळया संततीचा निर्वंश न व्हावा म्हणून ती अधिक संख्येनें जन्मास यावी.

डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं निसर्गाची ही योजना म्हणजे कांहीं निव्वळ कल्पनेचा खेळ नाहीं. कारण प्रोटीनच्या भरपूर पुरवठ्यामुळें प्रजोत्पादनशक्ति नेमकी कशी कमी होते आणि प्रोटीनच्या अभावानें ती नेमकी कशी वाढते यासंबंधींचें शरीरशास्त्र आतां पूर्णपणें माहीत आहे. ते म्हणतात कीं स्त्रियांची गर्भधारणक्षमता ही स्त्रीजननेंद्रियजन्य हार्मोन्सच्या उत्पादनावर आणि या हार्मोन्सच्या रक्तांतील प्रमाणावर अवलंबून असते. यकृताच्या अनेक कार्यापैकीं एक कार्य रक्तांत प्रमाणाबाहेर असलेली स्त्रीत्वाचीं हार्मोन्स नष्ट करणें असें आहे. प्रोटीनच्या अभावीं यकृत् अशक्त होतें आणि रक्तांत प्रमाणाबाहेर असलेलीं स्त्रीत्वाचीं हार्मोन्स तें नष्ट करूं शकत नाहीं. त्यामुळें अशा स्त्रियांच्या रक्तांत स्त्रीत्वाचीं हार्मोन्स प्रमाणाबाहेर रहातात आणि त्यामुळें या स्त्रियांची गर्भधारणक्षमता वाढते. अशा रीतीनें या शारीरिक घटनांतून निसर्ग आपलें कार्य करीत असतो आणि पूर्वी म्हटल्याप्रमाणें प्रोटीनच्या अभावीं दुबळी होणारी संतति निर्वंश होऊं नये म्हणून अधिक संख्येनें जन्मास आणतो.

डॉ. स्लोनाकर यांनीं केलेल्या उंदरांवरील प्रयोगांची ही माहिती दिल्यानंतर डॉ. कॅस्ट्रो म्हणतात; "जी गोष्ट उंदरांची तीच माणसांनाहि लागू आहे." कारण, पृथ्वीवरील निरनिराळया देशांतील जन्मसंख्येच्या प्रमाणाची आणि तेथील आहारांत असलेल्या प्रोटीनच्या प्रमाणाची तुलना केल्यास असें दिसून येतें कीं ज्या लोकांच्या आहारांत अधिक प्रोटीन आहे त्यांच्यांतच जन्मसंख्येचें प्रमाण कमी आहे. उलट, ज्या लोकांच्या आहारांत प्रोटीनचें प्रमाण कमी आहे त्यांच्यांतच जन्मसंख्येचें प्रमाण अधिक आहे. हें दाखविण्याकरितां त्यांनीं एक सविस्तर तुलनात्मक कोष्टक दिलें आहे. हें कोष्टक डॉ. करंदीकरांच्या आरंभीं उल्लेखिलेल्या लेखांत पान ८ वर दिलेलें आहे.

अपुऱ्या आणि निकृष्ट अन्नाचे उंदीर वगैरे प्राण्यांच्या शरीरावर ज्या तऱ्हेचे परिणाम घडून त्यांची प्रजोत्पादनशक्ति कमी होते तशाच तऱ्हेचे परिणाम माणसाच्या शरीरावर तर होतातच पण शिवाय उपासमारीनें उत्पन्न होणाऱ्या मानसिक अवस्थेंत विषयवासनाहि अधिक चेतावतात. नैमित्तिक उपासमारीनें विषयवासना मंदावतात हें सांगितलेंच आहे. त्याचें कारण म्हणजे उपाशी मनुष्यास अन्नाचा ध्यास लागलेला असतो हें होय. या उलट नेहमींच अर्धपोटी असलेल्या माणसाची भूकच हळू हळू कमी कमी होत जाते. इतकी कीं आपण अर्धपोटी उपाशी आहोंत याची त्याला जाणीवहि होईनाशी होते आणि अन्न मिळविण्याकरतां करावी लागणारी धडपड करण्याची इच्छाहि त्याला उरत नाहीं. अशा अवस्थेंत विषयवासना आणि विषयोपभोगच त्याच्या मनाला विरंगुळा आणि समाधान देऊं शकतात. अशा रीतीनें नित्याच्या उपासमारीनें आणि निकृष्ट अन्नानें एकीकडे शारीरिक घडामोडींतून प्रजोत्पादनशक्ति वाढत असतां त्याचबरोबर दुसऱ्या बाजूस मानसिक अवस्थाहि विषयवासनेस अनुकूल होत असते. याशिवाय डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं अन्नाभावीं दुबळया झालेल्या शरीरास कांहीं सामाजिक गरजाहि निर्माण होतात. उदाहरणार्थ, त्याच्या दुबळया शरीरास मनुष्यबळाची गरज वाटूं लागते आणि स्वतःला जगविण्याकरितां अधिक मनुष्यबळ हवें म्हणून तो पुत्रसंततीची वासना धरूं लागतो.

अशा रीतीनें अन्नाच्या अभावीं शारीरिक, मानसिक, सामाजिक अशा सर्व बाजूंनीं प्रजोत्पादनाला अनुकूल परिस्थिति निर्माण होते आणि उपासमार चालू असलेल्या लोकांतच लोकसंख्या अधिक झपाट्यानें वाढते. डॉ. कॅस्ट्रो यांच्या प्रतिपादनाचा हा सारांश आहे.

डॉ. कॅस्ट्रो यांनीं केलेलें बरेचसें विवेचन साहजिकच शरीरविषयक व वैज्ञानिक आहे. या विषयासंबंधींचें माझें ज्ञान अगदींच बेताचें असल्यानें त्यांतील ग्राह्य आणि अग्राह्य भाग किती हें मी सांगूं शकणार नाहीं. तसेंच शरीरविषयक ज्या गोष्टी डॉ. कॅस्ट्रो शास्त्रसिद्ध आहेत असें म्हणतात त्या खरोखरीच वादातीत आहेत किंवा नाहींत हें मला माहीत नाहीं. उदाहरणार्थ, डॉ. कॅस्ट्रो यांनीं वर्णन केलेला प्रोटीन, यकृत्, स्त्री-हार्मोन्स








आणि स्त्रियांची प्रजोत्पादनशक्ति यांचा परस्परसंबंध ते म्हणतात इतका शास्त्रसिद्ध आहे किंवा नाहीं हें बघणें जरूर आहे. येथें मी एक सामान्य आणि या विषयासंबंधीं विशेष तंत्रविज्ञानाची माहिती नसलेला वाचक म्हणून त्यांच्या विवेचनासंबंधीं ज्या कांहीं शंका मला येतात त्या मांडणार आहे.

माझी पहिली शंका डॉ. कॅस्ट्रो यांनीं केलेल्या उपासमारीच्या दोन प्रकारांसंबंधीं आहे. डॉ. कॅस्ट्रो यांनीं उपासमारीचे नैमित्तिक आणि नित्याची असे दोन प्रकार केले आहेत. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें नैमित्तिक उपासमारीनें प्रजोत्पादनशक्ति कमी होते. उलट, नित्याच्या उपासमारीनें ती वाढते. माझी शंका अशी कीं नैमित्तिक आणि नित्याची उपासमार यांतील फरक नक्की कसा करावयाचा ? म्हणजे किती दिवसाच्या उपासमारीस नैमित्तिक म्हणावयाचें आणि किती दिवसानंतर तिला नित्याची समजावयाचें ? या दोन प्रकारच्या उपासमारींचे विषयवासना आणि प्रजोत्पादन-शक्ति यांवर होणारे परिणाम इतके वेगळे किंबहुना एकमेकांच्या इतके उलट आहेत कीं उपासमारीच्या किती वेळानंतर ते उलट होऊं लागतात हें जाणून घेणें आवश्यक आहे. वरवर पाहातां माझी प्रथम अशी समजूत झाली कीं डॉ. कॅस्ट्रो म्हणतात ती नैमित्तिक उपासमार फारच थोड्या मुदतीची असेल. उदाहरणार्थ, चारपांच दिवस, पांचसात दिवस उपाशी किंवा अर्ध-पोटी रहाण्याचा प्रसंग आला तर एकूण परिणाम काय होतील याची कल्पना करतां येते. पांचसात दिवसांच्या संपूर्ण लंघनांत शरीर व मन अन्नाभोंवतीं कसें घुटमुळत असतें याचा अनुभव, ज्यांनीं लंघन करण्याची कधीं खटपट केली असेल, त्यांना आहेच.

संपूर्ण लंघनाऐवजीं कांहीं दिवस अर्धपोटीं राहण्यानें काय होतें हें सांगणें अवघड आहे. संपूर्ण लंघनाची चिकित्सा करणाऱ्यांच्या मतें संपूर्ण लंघन आणि अर्धपोटीं रहाणें यांचे शरीरावर होणारे परिणाम अगदीं वेगळे आहेत. परंतु घटकाभर हा फरक बाजूस ठेवून असें समजूं कीं संपूर्ण लंघनाचे जे परिणाम तेच थोड्याफार फरकानें अर्धपोटीं रहाण्यानेंहि होतात. असें समजलें तरी मुख्य मुद्दा असा कीं हे परिणाम असे किती दिवस संपूर्ण होत असतात ? संपूर्ण लंघन हें सामान्यतः दोन महिन्यांच्या पलीकडे करणेंच अशक्य असल्यानें दोन महिन्यांपेक्षां फार अधिक मुदतीच्या संपूर्ण लंघनाचा परिणाम मनुष्य मरण्यांतच होतो. परंतु अर्धपोटीं बरेंच दिवस रहातां येतें. तसें केल्यास एकदोन महिन्यानंतर काय होतें हा प्रश्न आहे. डॉ. कॅस्ट्रो यांनीं वर्णन केलेल्या मिनेसोटा विद्यापीठांतील विद्यार्थ्यांवरील उपासमारीचा प्रयोग सहा महिने चालू होता. एवढ्या मुदतींत ह्या विद्यार्थ्यांच्या विषयवासना हळूं हळूं कमी होत होत शेवटीं बहुतेक सर्व विद्यार्थ्यांच्या विषयवासना पूर्णपणें नष्ट झाल्याचें डॉ. कॅस्ट्रो सांगतात म्हणजे सहा महिने मुदतीची अर्धपोटीं उपासमार ही सुद्धां डॉ. कॅस्ट्रो यांच्या व्याख्येप्रमाणें नैमित्तिक उपासमारच समजावयास हवी.

या सर्व विद्यार्थ्यांना सहा महिने अर्धपोटीं ठेवलें म्हणजे नेमकें कायकाय केलें, या प्रयोगकाळांत हे सर्व विद्यार्थी आपले इतर व्यवहार कितपत करीत असत याची सविस्तर माहिती अर्थातच डॉ. कॅस्ट्रो यांना त्यांच्या पुस्तकांत देणें शक्य नव्हतें. तसेंच या विद्यार्थ्यांच्या विषयवासनेवर जे परिणाम झाले त्याशिवाय त्यांच्या शारीरिक व मानसिक स्थितीवर आणखी काय परिणाम झाले त्यासंबंधींहि कॅस्ट्रो यांनीं कांहीं माहिती दिलेली नाहीं. उदाहरणार्थ, ह्या सहा महिन्यानंतर या विद्यार्थ्यांना चालतां येत होतें का ? ते आपले इतर सर्व व्यवहार नीट करीत होते का ? त्यांच्या इतर वासना व इच्छा – जसें फिरावयास जाणें, खेळणें, गप्पागोष्टी करणें, वाचनलेखन करणें, चित्रपट पहाणें, संगीत ऐकणें – यांवर काय परिणाम झाले ? आणि या विद्यार्थ्यांची विषयवासना नष्ट झाली म्हणजे नेमकें काय झालें ? म्हणजे सामान्यपणें या विद्यार्थ्यांची विषयवासना कशी व्यक्त होत असे आणि सहा महिन्यांच्या उपवासानंतर ती पूर्णपणें नष्ट झाली म्हणजे नेमकें काय होऊं लागलें यासंबंधीं हवा तसा खुलासा डॉ. कॅस्ट्रो यांनीं केलेला नाहीं. यामुळें या प्रयोगाचें प्रत्यक्ष स्वरूप काय होतें हें नीटसें ध्यानांत येत नाहीं. या प्रयोगाचे निर्णय कोठें प्रसिद्ध झाले आहेत, त्या-संबंधीं इतरत्र कांहीं चर्चा, टीका झाली आहे काय ह्याचाहि उल्लेख डॉ. कॅस्ट्रो यांनीं केलेला नाहीं. त्यामुळें ह्या प्रयोगांची अधिक चर्चा करणें येथें शक्य नाहीं. तात्पुरतें या प्रयोगाचें तात्पर्य एवढेंच समजावयाचें कीं सहा महिने मुदतीच्या अर्धपोटी उपवासाचे परिणामहि

अगदीं नैमित्तिक उपवासासारखेच असतात आणि त्यामुळें सहा महिने मुदतीची उपासमारहि डॉ. कॅस्ट्रो यांच्या व्याख्येप्रमाणें नैमित्तिकच समजावयास हवी.

या संबंधांत दुसरा पुरावा म्हणून डॉ. कॅस्ट्रो यांनीं कर्नल यूजेन जेकब यांच्या जपानांतील युद्धकैद्यांच्या छावणींतील अनुभवांची माहिती दिली आहे. तेथेंहि हाच अनुभव आला कीं अर्धपोटी उपासमारीचा परिणाम म्हणून या युद्धकैद्यांपैकीं बहुतेक सर्वांची विषयवासना पूर्णपणें नष्ट झाली. जपानी छावणींत युद्धकैद्यांची उपासमार झाली असणें संभवनीय आहे. परंतु या शिवाय त्यांच्या मनावर परिणाम करणाऱ्या इतरहि कांहीं गोष्टी त्या सुमारास होत असाव्यात असें वाटतें. उदाहरणार्थ, जें युद्ध लढण्याकरितां म्हणून हे सैनिक घरदार सोडून निघाले होते तें युद्ध चालूं असतांनाच ते कैदी म्हणून हतबल होऊन बसले होते याची खंत त्यांतील कांहींना तरी वाटत असावी. तसेंच हे सैनिक युद्धकद्यांच्या छावणींत काल काढीत असतांना त्यांचीं बायकामुलें हजारों मैल दूर रहात असून त्यांजकडून पत्रोत्तरहि बहुधा क्वचितच येत जात असावें. त्यांची काळजी, नातलगांच्या आठवणी याचाहि परिणाम कांहीं जणांच्या तरी मनावर होत असलाच पाहिजे. शिवाय, एखादा मनुष्य आपल्या बायकोबरोबर, आपल्या माणसांत, ओळखीच्या लोकांत रहात असतांना त्याच्या विषयादि ज्या कांहीं वासना असतील, त्या जशाच्या तशाच, तो मनुष्य अगदीं परक्या ठिकाणीं, युद्धपरिस्थितींत रहात असतां, त्याची उपासमार झाली नाहीं तरी कायम रहाव्यात हेंहि संभवनीय वाटत नाहीं. यामुळें युद्धकैद्यांच्या मानसिक अवस्थेचें आणि त्यांच्या आणि त्यांच्या कमी झालेल्या विषयवासनेचें कारण सर्वस्वी त्यांची होत असलेली उपासमारच होय असें म्हणणें जरा अवघड वाटतें.

तरीपण तात्पुरता हा मुद्दा सोडून देऊन जें झालें असें म्हटलें आहे तें खरोखरीच झालें आणि तें सारें उपासमारीमुळेंच झालें असें समजूं. कर्नल यूजेन जेकब यांचे हे अनुभव एकूण अडतीस महिने मुदतीचे आहेत. आणि या मुदतींत सर्व कैद्यांची विषयवासना कमी कमीच होत असल्याचें त्यांच्या निदर्शनास आलें. यावरून अडतीस महिने मुदतीची अर्धपोटी उपासमार हीहि डॉ. कॅस्ट्रो यांच्या नैमित्तिक उपासमारींतच मोडते असें म्हणावयास हवें.

मग प्रश्न असा कीं किती मुदतीनंतर ही अशी उपासमार नित्याची होऊन तिचे परिणाम उलट होऊं लागतात? नैमित्तिक आणि नित्याच्या उपासमारींतील मुख्य फरक असा दिसतो कीं नैमित्तिक उपासमारींत मनुष्याची भूक जागी असते, त्याचें मन अन्नाभोंवतीं घोटाळत असतें आणि अन्न मिळविण्याकरतां खटपट करावी लागली आणि करतां आली तर ती करण्याची त्याची तयारी असते. या सर्व कारणांनीं त्याच्या इतर सर्व वासना मागें पडतात. या उलट, नित्याच्या उपासमारीनें माणसाची भूक हळूं हळूं कमी कमीच होत जाते, आणि शेवटी ती पूर्णपणें मरते, भुकेची व आपण अधपोटी रहात असल्याची जाणीवहि त्यास रहात नाहीं. अशा रीतीनें अन्नावरील वासना कमी झाली कीं त्याच्या इतर वासना जागृत होऊन जोरानें पुढें येतात आणि त्यांच्याच उपभोगांत तो समाधान मानूं लागतो. मिनेसोटा विद्यापीठांतील प्रयोग आणि जपानांतील युद्धकैद्यांच्या छावणींतील अनुभव हे जसें डॉ. कॅस्ट्रो म्हणतात तसें खरे धरले आणि त्यासंबंधींची त्यांची मीमांसा व निदान मान्य केलीं तर असा अर्थ होतो कीं सहा महिन्याच्या किंबहुना अडतीस महिन्याच्या अधपोटी उपासमारीनंतरहि मनुष्याची भूक कायम रहाते, इतकेंच नव्हे तर प्रखर होते; इतकी कीं विषयवासनेसारखी प्रबल वासनाहि तिच्यासमोर लुप्त होते. हें कितपत खरें वा खोटें आहे यासंबंधीं आणखी कांहीं स्वतंत्र पुरावा असल्यास मला माहित नाहीं.

हे झाले नैमित्तिक व नित्याच्या उपासमारीचे माणसाच्या मानसिक अवस्थेवर होणारे भिन्न भिन्न परिणाम. आतां त्याचेच शारीरिक परिणामहि कसे भिन्न भिन्न आहेत तें पहाः नैमित्तिक उपासमारीनें माणसाची प्रजोत्पादनशक्ति मंदावण्याचीं शरीरशास्त्रीय कारणें सांगतांना डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं "अशा तऱ्हेच्या उपासमारीनें शरीराच्या इतर इंद्रियांबरोबर मनुष्याचीं जननेंद्रियें आणि विशेषतः त्यांतील हार्मोन्स उत्पन्न करणाऱ्या ग्रंथींचीहि उपासमार होते. त्यामुळें लैंगिक होमान्सचें उत्पादन कमी पडून विषयवासना व प्रजोत्पादनशक्ति कमी होतात. हें वर्णन स्त्री व पुरुष दोघांसहि लागू आहे असें मी समजतों. याउलट नित्याच्या उपासमारीनें काय होतें तें पहा.








नित्याच्या उपासमारीनें विशेषतः प्रोटीनच्या अभावीं प्रथम यकृत् अशक्त होतें. डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं यकृताच्या अनेक कार्यांपैकीं एक कार्य असें आहे कीं स्त्रियांच्या रक्तांतील जादा प्रमाणांत असलेली स्त्री-हार्मोन्स नष्ट करणें. यकृत् अशक्त झाल्यानें हें कार्य त्याच्याकडून नीटसें होत नाहीं आणि म्हणून स्त्रियांची प्रजोत्पादनशक्ति वाढते. या सर्व वर्णनांत नित्याच्या उपासमारीनें पुरुषावर शारीरिक परिणाम काय होतात हें त्यांनीं स्पष्ट सांगितलेलें नाहीं. परंतु बहुधा स्त्रियांवर होतात तशाच प्रकारचे ते असावेत असें मी समजतों.

आतां प्रश्न एवढाच कीं नैमित्तिक उपासमारींत यकृताचें काय होतें ? सहासहा महिने किंवा अडतीस महिन्यांच्या उपासमारींतहि यकृतावर कांहींच परिणाम होत नाहीं काय ? याच्या उलट नित्याच्या उपासमारींत हार्मोन्स उत्पन्न करणाऱ्या लैंगिक ग्रंथीचें काय होतें ? त्याचीहि उपासमार होऊन हॉर्मोन्सचें उत्पादनच कमी होत नाहीं का ? डॉ. कॅस्ट्रो यांच्या विवेचनावरून हें असें कांहीं होत नसावेसें दिसतें. कारण, ते म्हणतात त्याप्रमाणें स्त्रियांच्या रक्तांत जादा झालेलीं हार्मोन्स अशक्त झालेलें यकृत् नष्ट करूं शकत नाहीं त्यामुळें त्यांची प्रजोत्पादनशक्ति वाढते. यावरून उघड आहे कीं नित्याच्या उपासमारीनें हार्मोन्सचें उत्पादन मुळींच कमी होत नाहीं कारण रक्तांत नको इतक्या प्रमाणांत तीं वावरूं लागतात. केवळ विचारें यकृतच अशक्त होऊन हा सर्व प्रकार उघड्या डोळयानें पहात असतें !

नैमित्तिक आणि नित्याच्या उपासमारीचे डॉ. कॅस्ट्रो यांनीं केलेले प्रकार आणि त्यांचे लैंगिक हार्मोन्स उत्पन्न करणाऱ्या ग्रंथींवर होणारे परस्परविरोधी परिणाम यासंबंधीं शारीरशास्त्र काय असेल तें असेल, परंतु तर्कशास्त्राच्या दृष्टीनें हा बुद्धिवाद म्हणजे बुद्धिभ्रम उत्पन्न करण्याचा एक नेहमींचा प्रकार आहे. तो उकलून सांगावयाचा म्हणजे असा : यकृत् आणि लैंगिक हार्मोन्स उत्पन्न करणाऱ्या ग्रंथी यांचें परस्परविरोधी कार्य कल्पावयाचें. नंतर उपासमारीचे दोन प्रकार कल्पून नैमित्तिक उपासमारीचे परिणाम केवळ हार्मोन्स उत्पन्न करणाऱ्या ग्रंथींवर आणि नित्याच्या उपासमारीचे परिणाम केवळ यकृतावर काय होतात ते सांगावयाचे. इतकें केलें कीं नैमित्तिक व नित्य उपासमारीचे परिणाम प्रजोत्पादनशक्तीवर कसे वेगवेगळे होतात तें सिद्ध होतें. हें सारें खरोखरीच असें असूंहि शकेल. परंतु तसें असेल तर डॉ. कॅस्ट्रो यांनीं दिला आहे त्यापेक्षां अधिक शरीरशास्त्रीय खुलासा व पुरावा जरूर आहे.

डॉ. कॅस्ट्रो यांचें हें शरीरशास्त्रीय विवेचन बाजूस ठेवून त्यांनीं पुढें मांडलेला प्रायोगिक पुरावा आतां पाहूं. त्यांमध्यें डॉ. स्लोनाकर यांनीं केलेले उंदरावरील प्रयोग सर्वांत महत्त्वाचे आहेत. तत्पूर्वी एक अनुभवसिद्ध गोष्ट म्हणून डॉ. कॅस्ट्रो यांनीं गवळयांच्या कांहीं अनुभवांचा उल्लेख केला आहे. ते म्हणतात कीं प्रत्येक गवळयाचा हा अनुभव आहे कीं जादा लठ्ठावलेल्या गाईम्हशी लवकर गाभण रहात नाहींत, याउलट, त्यांचे खाणें जरा तोडून त्यांना रोडावल्या तर त्या लवकर गाभण रहातात. यावरून हें उघड होतें कीं सकस व भरपूर अन्नानें जननशक्ति कमी होते आणि उपासमारीनें ती वाढते. यांतहि शब्दांची थोडीफार ओढाताण आहे असें वाटतें. गाई किंवा म्हशी जेव्हां अवास्तव लठ्ठ होतात कीं ज्यामुळें त्या लवकर गाभण रहात नाहींत तो लठ्ठपणा हा कांहीं शरीराची सुदृढ अवस्था दाखविणारा नसून तें एक शरीरप्रकृतीचें विकृत स्वरूपच असतें. याउलट, गवळी जेव्हां त्यांचें कांहीं काल खाणें तोडतात कीं त्यामुळें त्या सडपातळ होऊन लवकर गाभण रहातात त्यावेळीं त्यांची उपासमार होतें हें म्हणणेंहि कितपत योग्य आहे ? आणि अशावेळीं त्यांची उपासमार होते असें म्हटलेंच तर निदान ही उपासमार डॉ. कॅस्ट्रो यांच्या व्याख्येप्रमाणें नैमित्तिक उपासमारच म्हणावी लागेल. मग त्यानें प्रजोत्पादनशक्ति वाढते ती कशी ? शिवाय गवळयांचे अनुभवच सांगावयाचे म्हटलें तर गवळयांचा असाहि अनुभव आहे कीं लहानपणापासून नीट दूधावर आणि नंतर पौष्टिक अंबवणावर उत्तम पोसलेल्या कालवडीच लवकर गाभण रहातात. त्यासंबंधीं डॉ. कॅस्ट्रो यांना काय म्हणावयाचें आहे ? तात्पर्य काय कीं गवळयांचे गाईम्हशींचे अनुभव डॉ. कॅस्ट्रो यांच्या सिद्धांतास विशेष पुष्टि देतील असें वाटत नाहीं.

डॉ. कॅस्ट्रो यांनीं वर्णन केलेले डॉ. स्लोनाकर यांचे उंदरावरील प्रयोग मात्र फारच महत्त्वाचे आहेत. हे प्रयोग सन १९२५ ते १९२८ च्या दरम्यान प्रसिद्ध झालेले आहेत. डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं या प्रयोगांना



अनुक्रमणिका







मिळावी तशी प्रसिद्धि मिळाली नाहीं. ती कां मिळाली नाहीं, याच दिशेनें गेल्या पंचवीस वर्षांत आणखी कोणी तें कधीं कां करून पाहिलें नाहींत हे प्रश्न गौण म्हणून सोडून देऊं. डॉ. कॅस्ट्रो यांनीं दिलेले निकाल हे डॉ. स्लोनाकरांच्या प्रयोगांचे वास्तविक आणि पूर्ण निकाल आहेत आणि तशाच तऱ्हेचे पुनः प्रयोग केल्यास हेच निकाल कमीअधिक प्रमाणानें मिळतील असें समजून या प्रयोगांचा काय अर्थ होतो तें पाहूं.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें डॉ. स्लोनाकर यांनीं उंदरांच्या तीन गटांना तीन वेगवेगळ्या आहारावर ठेवलें. पैकीं पहिल्या गटाच्या आहारांत १० टक्के प्रोटीन होतें. या गटांतील ५ टक्के नर आणि ६ टक्के माद्या वांझ निघाल्या. दुसऱ्या गटाच्या आहारांत १८ टक्के प्रोटीन होतें आणि त्यांतील २२ टक्के नर आणि २३ टक्के माद्या वांझ निघाला. तिसऱ्या गटाच्या आहारांत २२ टक्के प्रोटीन होतें. त्यांतील ४० टक्के नर आणि ३८ टक्के माद्या वांझ निघाल्या.

यासंबंधीं पहिला प्रश्न असा कीं उंदरांच्या प्रमाणशीर आहारांत म्हणजे ज्या आहारानें ते सुदृढ आणि निकोप रहातील त्यांत प्रोटीनचें प्रमाण काय असावें याची मला तितकीशी कल्पना नसली तरी मला असें वाटतें कीं १०,१८ किंवा २२ टक्के प्रोटीन हें प्रमाणाबाहेर होत असावें. यासंबंधीं माहितगारांकडून चौकशी करावयास हवी. परंतु मी म्हणतों तसें जर खरें असेल तर डॉ. स्लोनाकरांनीं अधिकांशानें दिलेलें प्रोटीन हा एक युक्त आहाराचा भाग समजण्याऐवजीं एक औषधाचाच प्रकार मानावयास हवा. तसें झाल्यास त्यांच्या प्रयोगांचा निष्कर्ष सकस व युक्त आहारानें जननशक्ति कमी होते असा नसून अतिरेकी वा बेहिशेबी प्रोटीन खाण्यानें वांझपण येतें असा होईल. डॉ. कॅस्ट्रो यांचा मूळ दावा असा आहे कीं आहारांत प्रोटीन युक्त आहारांत असावें त्यापेक्षां कमी झालें म्हणजेच प्रोटीन अन्नाबाबत शरीराची उपासमार झाली तर प्राण्याची प्रजोत्पादनशक्ति वाढते. हा दावा सिद्ध करण्याकरतां उंदरावर प्रयोग करावयाचेच तर त्यांत एका गटास युक्त आहार द्यावयास हवा आणि इतर गटांस त्यापेक्षां कमी प्रोटीनचा आहार द्यावयास हवा. यानंतर जर असें दिसलें कीं इतर गटांतील उंदरांची संतति युक्त आहार घेणाऱ्या उंदरांच्या संततीपेक्षां संख्येनें अधिक आहे तरच डॉ. केस्ट्रो यांचा सिद्धांत निदान उंदरांच्या बाबतींत तरी सिद्ध झाला असें म्हणतां येईल.

आहारांतील १८ किंवा २२ टक्के प्रोटीन हें उंदरांच्या युक्त आहाराच्या दृष्टीनें बेहिशेबी जास्त असावें असें वाटण्याचें एक कारण असें कीं त्याचा परिणाम म्हणून २२-२३ टक्के आणि ४०-३८ टक्के नर व माद्या वांझ झाल्याचें आढळून आलें. आतां सामान्य प्रजोत्पादनशक्ति असणें हें जर सुदृढ आणि निकोप शरीरस्थितीचें एक लक्षण समजलें तर वांझपण हें एक विकृत लक्षणच समजावयास हवें. त्यामुळें वांझपणाचें एवढें मोठें प्रमाण उत्पन्न करणारा आहार हा युक्त आहार म्हणतां येणार नाहीं.

यावर कोणी असें म्हणेल कीं प्रयोगाचे निकाल अधिक निश्चित मिळण्याकरतां आणि प्रोटीनच्या वाढत्या प्रमाणानें प्रजोत्पादनशक्तीवर होणारे परिणाम स्पष्टपणें दाखविण्याकरितां प्रयोगापुरतें प्रोटीनचें हें एवढें अतिरेकी प्रमाण वापरण्यांत आलें होतें. प्रत्यक्ष व्यवहारांत प्रोटीनचें एवढें प्रमाण वापरून वांझपणाचें प्रमाण इतकें वाढविण्याचें कारण नाहीं. हें म्हणणें अर्थातच बरोबर आहे. माझा मुद्दा इतकाच कीं युक्त आहारांत असावें त्यापेक्षां कमी प्रोटीन देऊन प्रयोग केल्याशिवाय त्याचे परिणाम काय हें कळणार नाहीं. आपण घटकाभर असें समजूं कीं उंदरांच्या युक्त आहारांत प्रोटीनचें प्रमाण १० टक्के असावें. असें असल्यास १० टक्क्यापेक्षां कमी प्रोटीन दिल्यास त्याचा परिणाम काय होईल हें या प्रयोगांवरून समजत नाहीं. माझा मुद्दा असा कीं २२,१८ आणि १० टक्के असें प्रोटीन कमी केल्यानें वांझपणाचें प्रमाण कमी कमी होत आलें म्हणून १० टक्क्यापेक्षां कमी प्रोटीन दिलें तर वांझपणाचें प्रमाण आणखी कमी होईल असें कांहीं निश्चित सांगतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, असें असणें अगदीं शक्य आहे कीं युक्त आहारांत असावें तितकें प्रोटीन आहारांत असलें म्हणजे शरीर सुदृढ आणि सुस्थितींत राहून वांझपणाचें प्रमाण अगदीं कमी होतें. हेंच प्रोटीनचें प्रमाण आवश्यकतेपेक्षां जास्त केलें तर शरीराच्या सुस्थितीस अपाय होऊन इतर विकाराबरोबर वांझपणाचेंहि प्रमाण वाढतें. हें जसें खरें तसेंच प्रोटीनचें प्रमाण फार कमी झाल्यासहि शरीरास अपाय होऊन










वांझपणाचें प्रमाण वाढूं शकेल. हें असें आहे असें मी म्हणत नाहीं पण असें असणें अगदीं शक्य आहे. आणि तें तसें होतें हें डॉ. स्लोनाकर यांच्या प्रयोगांनीं सिद्ध होत नाहीं. त्यामुळें डॉ. कॅस्ट्रो यांचा जो मूळ दावा कीं प्रोटीनच्या कमतरतेनें प्रजोत्पादनशक्ति कमी होते तो उंदरांबाबतहि सिद्ध झाला आहे असें म्हणतां येत नाहीं.

दुसरा मुद्दा असा कीं उंदरांच्या एखाद्या गटाची किंवा माणसाच्या एखाद्या समाजाची प्रजोत्पादनशक्ति कमी करण्याचे दोन मार्ग आहेत. एक तर त्या गटांत किंवा समाजांत वांझपणाचें प्रमाण वाढविणें. दुसरा म्हणजे वांझपणाचें प्रमाण न वाढूं देतां केवळ संतति–संख्या कमी करावयाची. डॉ. स्लोनाकर यांच्या प्रयोगानें बेहिशेबी अधिक प्रोटीन घेतल्यानें म्हणजेच प्रोटीनचा औषधासारखा उपयोग केल्यानें प्रजोत्पादनशक्ति कमी होते असें सिद्ध होतें असें मानलें तरी त्याचा परिणाम कोणत्या प्रकारचा आहे हें पहावयास हवें. प्रोटीनच्या बेहिशेबी वाढत्या प्रमाणानें वांझपणाचें प्रमाण वाढतें हें वर आलेंच आहे. आतां ज्यांना प्रत्यक्ष वांझपण आलें नाहीं त्यांची संततिसंख्या कमी करण्याकडे या प्रोटीनचा कांहीं उपयोग झाला का तें पाहूं. यासंबंधीं डॉ. स्लोनाकर यांच्या प्रयोगाचे निकाल डॉ. कॅस्ट्रो यांनीं दिले आहेत ते असे: उंदरांच्या पहिल्या गटांत कीं ज्यांच्या आहारांत १० टक्के प्रोटीन होतें त्यांना सरासरीनें २३·३ पिल्लें झालीं. १८ टक्के प्रोटीन असलेल्या दुसऱ्या गटांत ही सरासरी १७·४ होती; आणि २२ टक्के प्रोटीन असलेल्या तिसऱ्या गटांत ही सरासरी केवळ १३·८ होती. यावरून वरवर पहातां पिल्लांची सरासरी कमी झाल्याचें दिसत असलें तरी ही सरासरी काढतांना वांझ उंदीरहि लक्षांत घेतलेले असल्यानें ज्यांना पिल्लें झालीं त्यांची पिल्लांची संख्या सरासरीनें कमी झाली असें स्पष्ट होत नाहीं. तें दाखविण्याकरतां ज्यांना पिल्लें झालीं तेवढेच उंदीर लक्षांत घेऊन पिल्लांची सरासरी काढावयास हवी. हा मुद्दा स्पष्ट करून सांगण्याकरतां थोडेसें अंकगणित मांडतों :

पिल्लांच्या सरासऱ्या दर मादी उंदरामागें दिल्या आहेत असें समजूं. आतां पहिल्या गटांत शंभर उंदीरमाद्या होत्या असें समजा. त्यांना सरासरीनें २३·३ म्हणजे एकूण २३३० पिल्लें झालीं. परंतु या शंभर माद्यांपैकीं ६ टक्के म्हणजे सहा माद्या वांझच होत्या. म्हणजे, शंभरापैकीं ९४ माद्यांनाच पिल्लें झालीं. याचा अर्थ असा कीं पहिल्या गटांत ज्या माद्यांना पिल्लें झालीं त्यांना सरासरीनें (२३३० भागिले ९४ म्हणजे) २४·८ पिल्लें झालीं. त्याचप्रमाणें दुसऱ्या गटांतहि शंभर माद्या होत्या असें समजलें तर त्यांना सरासरीनें १७·४ म्हणजे एकूण १७४० पिल्लें झालीं. पण या शंभर माद्यांपैकीं २३ टक्के म्हणजे २३ माद्या वांझच होत्या. म्हणजे ७७ माद्यांनाच पिल्लें झालीं. म्हणजे दुसऱ्या गटांत ज्यांना पिल्लें झालीं त्यांना सरासरीनें (१७४० भागिले ७७ म्हणजे) २२·६ इतकीं पिल्लें झालीं. त्याचप्रमाणें तिसऱ्या गटाकरितां गणित मांडल्यास त्यांतील ३८ टक्के वांझ माद्या सोडल्यास ज्यांना पिल्लें झालीं त्यांची सरासरी २२·३ पिल्लें पडते. सारांश, तीनहि गटांतील वांझ माद्या वगळल्या तर या तीन गटांत, ज्यांना पिल्लें झालीं त्यांची सरासरी अनुक्रमें २४·८, २२·६ आणि २२·३ असल्याचें दिसून येते. त्यांत पहिल्या, दुसऱ्या आणि तिसऱ्या गटाची सरासरी अनुक्रमें कमीकमी होत गेल्याचें दिसत असलें तरी या तीनहि सरासरींमधील फरक फारच थोडा असल्यानें तो निर्णायक समजतां येत नाहीं. डॉ. स्लोनाकर यांच्या उंदरावरील प्रयोगांचा सारांश हा कीं प्रमाणाबाहेर प्रोटीन खाण्यानें प्रजोत्पादनशक्ति कमी होते, ती मुख्यतः वांझपणाचें प्रमाण वाढल्यामुळें होते. ज्यांना संतति होते त्यांची संतति संख्येनें कमी करण्याकडे प्रोटीनचा फारसा उपयोग होतो असें दिसत नाहीं.

या प्रयोगांचे निर्णय माणसासहि कमीअधिक प्रमाणांत लागूं होतात असें समजावयाचें असेल तर वरील निष्कर्षांचे गांभीर्य लक्षांत घ्यावयास हवें. उदाहरणार्थ, या पिढींतील सर्व मातापित्यांना ते म्हणतील त्या प्रमाणांत प्रोटीन मिळण्याची व्यवस्था केली आणि सर्वांनीं सर्रास प्रोटीन खाण्यास सुरवात केली तर काय परिणाम होईल तें पहा. असें झाल्यास एका पिढींतच एकूण लोकसंख्येस आळा बसेल हें खरें. परंतु या प्रश्नाकडे एकूण लोकसंख्येच्या दृष्टीनें न पहातां एका कुटुंबाच्या दृष्टीनें पहातां काय स्थिति दृष्टीस पडेल ? कांहीं कुटुंबांत आज जें मुलांचें प्रमाण व संख्या आहेत तीं तशींच थोड्याफार फरकानें कायम रहा-












तील. उलट, कांहीं कुटुंबांत पति वा पत्नी पैकीं कोणासतरी वांझपण येऊन तीं कुटुंबें निर्वंश होतील. शिवाय, कुटुंब निर्वंश होण्यास पतिपत्नींपैकीं कोणाचें एकाचेंहि वांझपण पुरेसें असल्यानें निर्वंश होणाऱ्या कुटुंबांचं प्रमाण हें वांझ असणाऱ्या स्त्री किंवा पुरुषांच्या प्रमाणापेक्षां कितीतरी अधिक राहील. उदाहरणार्थ, असें समजूं कीं प्रोटीनच्या कांहीं एका खुराकामुळें डॉ. स्लोनाकर यांच्या उंदरांत झालें तसें ४० टक्के वांझपण पुरुष व स्त्री दोहोंतहि निर्माण झालें म्हणजे केवळ ६० टक्केच स्त्रीपुरुष संततिक्षम राहतील. आतां जे ६० टक्के संततिक्षम पुरुष आहेत त्यांच्या स्त्रियांतहि सरासरीनें ६० टक्के स्त्रियाच संततिक्षम असणार. त्यामुळें ६० टक्क्याचे ६० टक्के म्हणजे केवळ ३६ टक्केच पुरुष असे सांपडतील कीं जे स्वतः आणि ज्यांच्या स्त्रिया उभयतां संततिक्षम असतील. सारांश, केवळ ३६ टक्के कुटुंबांनाच संतति प्राप्त होईल. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे ज्या समाजांत ४० टक्के पुरुष व स्त्रिया वांझ आहेत त्यांत निर्वंश होणाऱ्या कुटुंबांचें प्रमाण जवळ जवळ ६४ टक्के राहील. कुटुंबाच्या दृष्टीनें जास्त मुलांपेक्षां अजिबात मुलें नसणें हें सामान्यपणें अधिक दुःखदायक असल्यानें लोकसंख्येला आळा घालण्याच्या ज्या उपायानें वांझपणा प्राप्त होण्याचा संभव असेल तो उपाय त्याज्यच समजावयास हवा. डॉ. कॅस्ट्रो यांनीं दिलेले डॉ. स्लोनाकरांचे प्रयोगांचे निकाल मान्य केले आणि तशाच तऱ्हेचे परिणाम माणसांतहि आढळतील असें समजलें तर अतिरेकी प्रोटीन खाण्यानें एकूण लोकसंख्येस आळा बसण्याचा संभव असला तरी त्याचे कौटुंबिक परिणाम अनिष्टच म्हणावयास हवेत.

डॉ. स्लोनाकर यांच्या उंदरावरील प्रयोगांची माहिती दिल्यानंतर अशाच तऱ्हेचे परिणाम माणसाच्या प्रजोत्पादनशक्तीवरहि होतात हें दाखविण्याकरितां डॉ. कॅस्ट्रो यांनीं स्वतंत्र जागतिक पुरावा पुढें मांडला आहे. त्यांत त्यांनीं अनेक देशांच्या आहारांतील प्रोटीनचें प्रमाण आणि त्या देशांतील जन्मांचें दर हजारीं लोकसंख्येशीं प्रमाण हीं दिलीं आहेत. त्यावरून अगदीं स्पष्ट दिसतें कीं जे लोक प्रोटीन अधिक खातात त्यांच्यांत जन्माचें प्रमाण कमी आहे.

हे सारे आंकडे कोठून घेतले आहेत यासंबंधीं डॉ. कॅस्ट्रो यांनीं कांहींच खुलासा केलेला नाहीं. परंतु ते कोठूनहि घेतलेले असले तरी पुष्कळदां हे आंकडे अगदीं कांहींच माहीत नाहीं असें म्हणण्यापेक्षां कांहींतरी आंकडा दिलेला बरा याच कारणानें दिलेले आणि घेतलेले असतात. उदाहरणार्थ, हिंदुस्थानचेंच बघावयाचें झालें तर डॉ. कॅस्ट्रो यांनीं हिंदुस्थानांतील जन्मप्रमाण हजारीं ३३ आणि हिंदुस्थानच्या दैनिक आहारांतील प्राणिज प्रोटीन्सचें प्रमाण ८·७ ग्रॅम असें दिलें आहे. हिंदुस्थानांतील जन्मनोंद किती सदोष आहे हें सर्वांच्या माहितीचें आहेच. त्यामुळें त्यांतून निघालेल्या जन्माच्या प्रमाणास अगदींच कांहीं नसल्यापेक्षां कांहींतरी बरें यापेक्षां अधिक महत्त्व देतां येत नाहीं. आहारविषयक संशोधनें तर हाताच्या बोटावर मोजण्याइतकीं सुद्धां हिंदुस्थानांत झालेलीं नाहींत. त्यावरून साऱ्या हिंदुस्थानचें म्हणून एक प्रमाण काढून देणें शक्य वाटत नाहीं. जी गोष्ट हिंदुस्थानची तीच थोड्याफार फरकानें इतर पुष्कळ देशांची आहे. त्यामुळें अशा तऱ्हेचे आंकडे सामान्यपणें उपयुक्त असले तरी एका शास्त्रीय सिद्धातास पुरावा म्हणून देण्याच्या लायकीचे ते नसतात.

दिलेले आंकडे बरोबर असून त्यांत हेतुपुरःसर जमवाजमव केलेली नाहीं असें समजलें तरीसुद्धां वेगवेगळया देशांतील जन्मप्रमाणांत जे फरक आहेत त्यांचें कारण त्या देशांच्या आहारांत असलेलें प्रोटीनचें कमी-अधिक प्रमाणच आहे हें कसें समजावयाचें ? त्याच्या आहारांतील प्रोटीनचें कमीअधिक प्रमाण हा कांहीं एकच फरक या देशांत नाहीं. पृथ्वीच्या पाठीवर वेगवेगळया अक्षांश व रेखांशावर हे देश बसलेले आहेत. या देशांतील हवामान व पावसाचें प्रमाण हीं वेगवेगळीं आहेत. या देशांतील लोक नाना तऱ्हेचे वेष घालतात आणि नाना तऱ्हेच्या भाषा बोलतात. यांपैकीं एखाद्या गोष्टीशीं त्यांतील जन्मप्रमाणाचा संबंध कां जोडूं नये ?

जन्मप्रमाणाच्या बाबतींतच जर बोलावयाचें तर त्यावर प्रोटीनचा परिणाम होत असो वा नसो परंतु प्रोटीनपेक्षांहि अधिक आणि निश्चित परिणाम ज्यांचा होतो अशा अनेक गोष्टी व परिस्थिति माहीत आहेत. उदाहरणार्थ, लोकसंख्येंत असलेले स्त्रियांचें प्रमाण, स्त्रियांतील विवाहितांचें प्रमाण, विवाहित स्त्रियांची वयवारी इत्यादि अनेक गोष्टींचा जन्मसंख्येच्या दर








हजारीं प्रमाणाशीं अगदीं निकटचा आणि कळण्यास सोपा असा संबंध आहे. दुसरे कोणतेहि महत्त्वाचे बदल न होतां केवळ स्त्रियांतील विवाहितांचें प्रमाण आणि विवाहित स्त्रियांची वर्गवारी बदलल्यानें दर हजारीं जन्मप्रमाणांत पुष्कळ फरक झाल्याचीं उदाहरणें आहेत. याशिवाय लोकसंख्येंतील साक्षरतेचें प्रमाण आणि त्याचा परिणाम म्हणून लोकांच्या वापरांत असलेलीं संततिनियमनाचीं साधनें यांचाहि जन्मसंख्येवर अर्थातच परिणाम होतो. उदाहरणार्थ, हिंदुस्थान आणि अमेरिका यांचीच तुलना करावयाची तर डॉ. कॅस्ट्रो म्हणतात त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील जन्मप्रमाण हजारीं ३३ आहे तर तेंच अमेरिकेंत केवळ १७·९ आहे. याचें कारण डॉ. कॅस्ट्रो यांचे मतें हिंदुस्थानच्या दैनिक आहारांत ८·९ ग्रॅमूस प्रोटीन आहे आणि अमेरिकेच्या आहारांत तेंच ६१·४ ग्रॅमूस आहे. पण याशिवाय इतर कांहीं फरक हिंदुस्थान आणि अमेरिकेंत नाहींत कां? हवामान, स्त्रियांचा सामाजिक दर्जा, विवाहसंस्था, स्त्रियांची वयवारी इत्यादि प्रत्येक बाबतींत महत्त्वाचे फरक या दोन देशांत आहेत. त्यांचा कांहींच परिणाम या दोन देशांच्या दर हजारीं जन्म प्रमाणावर होत नाहीं का? आणि शिवाय अमेरिकेंत दर वर्षी जे लक्षावधी डॉलर संततिनियमनाच्या साधनांवर खर्च होतात त्यांचाहि परिणाम तेथील जन्मप्रमाणावर कांहींच होत नाहीं का?

या सर्व कारणांनीं डॉ. कॅस्ट्रो यांचा जो मूळ दावा कीं नित्याच्या उपासमारीनें प्रजोत्पादनशक्ति वाढते आणि भरपूर सकस अन्नानें ती कमी होते हा सिद्ध झाला आहे असें मला वाटत नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं डॉ. कॅस्ट्रो म्हणतात त्याप्रमाणें अन्नाचें उत्पादन वाढविणें आवश्यक नाहीं. डॉ. कॅस्ट्रो यांनीं सुचविलेल्या साऱ्या उपायांनीं तसेंच आणखी कांहीं उपाय असतील तर ते सारे योजून अन्नाचें उत्पादन वाढवून तें मुबलक करणें अगदीं आवश्यक आहे.

डॉ. कॅस्ट्रो म्हणतात कीं लोकसंख्येच्या वाढीनें अन्नाचें दुर्भिक्ष निर्माण होतें हें खरें नसून अन्नाच्या दुर्भिक्षानेंच लोकसंख्या वाढते. अन्नाच्या कमतरतेनें लोकसंख्या झपाट्यानें वाढते हा डॉ. कॅस्ट्रो यांचा दावा घटकाभर मान्य केला तरी लोकसंख्येच्या वाढीनें अन्नाचें दुर्भिक्ष निर्माण होत नाहीं किंवा वाढत नाहीं ह्या म्हणण्याचा काय अर्थ? याचा अर्थ इतकाच करतां येईल कीं लोकसंख्या वाढलीच तर तिला पुरेसें अन्न भौतिक शास्त्रांच्या आधारें नेहमींच उत्पन्न करतां येईल. असें झालें तर उत्तमच. परंतु भौतिक शास्त्रांवर असा अमर्याद भरंवसा ठेवून चालणें कितपत इष्ट होईल? कारण यदाकदाचित् भौतिक शास्त्रें पुरेसें उत्पादन करण्यास असमर्थ ठरलीं आणि अन्नाचें दुर्भिक्ष्य एकदां जाणवूं लागलें कीं डॉ. कॅस्ट्रो यांच्या सिद्धांताप्रमाणें लोकसंख्या आणखी झपाट्यानें वाढू लागेल आणि परिस्थिति भौतिकशास्त्रांच्याहि आवांक्याबाहेर जाईल. असें होण्यापूर्वीच लोकसंख्या मर्यादेंत ठेवण्याचे इतर उपाय असल्यास त्यांचाहि विचार आणि उपयोग करावयास हरकत नसावी.

लोकसंख्या आणि अन्नटंचाई या प्रश्नाची कौटुंबिक बाजू अधिक जिव्हाळ्याची आहे ती दृष्टीआड करून चालणार नाहीं. या प्रश्नाचें प्राथमिक आणि वास्तविक स्वरूप कौटुंबिक आहे. त्या प्रश्नाचे जागतिक राष्ट्रीय वा सामाजिक स्वरूप हें कृत्रिमच आहे. हिंदुस्थानांतील अन्नटंचाईचा प्रश्न सोडविण्याकरितां, परदेशांतून होत असलेली अन्नधान्यांची आयात थांबविण्याकरितां किंवा एकदां उठलेलें धान्यवांटप यशस्वी करण्याकरितां म्हणून साऱ्यांनीं संततिनियमनाचा मोर्चा काढणें, हें जसें अनावश्यक आहे तसेंच मोठमोठालीं धरणें छोटेमोठे पाटबंधारे आणि विहिरी, नवीन नवीन रासायनिक खतें, जातिवंत बी-बियाणें, आधुनिक यंत्रसामग्री आणि शास्त्रशुद्ध शेती इत्यादि पंचवार्षिक योजनेंतील कार्यक्रमामुळें आतां लवकरच अन्नटंचाईचा राष्ट्रीय प्रश्न सुटेल या भरंवशावर आपणांस होण्याऱ्या मुलांची मोजदादहि न घेणें हेंहि खरें नाहीं. प्रत्येक कुटुंबाला ज्याच्या त्याच्या शारीरिक सुस्थितीप्रमाणें, आर्थिक परिस्थितीप्रमाणें, जीवनाविषयींच्या आर्थिक, बौद्धिक, सांस्कृतिक वा लैंगिक अपेक्षेप्रमाणें, आपल्या कुटुंबाचा विस्तार कमीअधिक करावा लागतो. म्हणून या संबंधीचे शास्त्रशुद्ध मार्ग व साधनें त्यास उपलब्ध असावयास हवींत.








श्री. विलिअम व्होग्ट

# जननसंख्येचें प्रमाण आणि प्राणिज प्रोटीन

[ पुण्याचे डॉ. र. भ. कर्णिक, माजी संपादक ' इंडिअन मेडिकल जर्नल,' यांनीं ' इंडिअन मेडिकल जर्नल'चा मे १९५२ चा अंक ' स्पेशल फॅमिली-प्लॅनिंग नंबर ' ( कुटुंबनियोजन-विशेषांक ) म्हणून काढला होता. त्या अंकाच्या संपादकीयांत त्यांनीं डॉ. कॅस्ट्रो यांच्या ' जॉग्रफी ऑफ हंगर ' या पुस्तकाचा उल्लेख करून त्या पुस्तकांतील जें मुख्य प्रतिपाद्य कीं " प्राणिज प्रोटीनची जर अन्नांत कमतरता असली तर जननक्षमता ( fertility ) वाढते; उलट तें प्रोटीन जर अन्नांत विपुल असेल तर जननक्षमता कमी होते " तें देऊन त्याच्या समर्थनार्थ कॅस्ट्रो यांच्या पुस्तकांतील विस्तृत अवतरणहि दिलें होतें. ह्या कुटुंबनियोजन-विशेषांकाची एक प्रत डॉ. कर्णिक यांनीं अमेरिकेंतील या विषयाचे सुप्रसिद्ध तज्ज्ञ वुइलिअम व्होग्ट (Vogt) यांच्याकडे पाठविली. श्री. व्होग्ट यांनीं पत्र पाठवून डॉ. कर्णिक यांचें एक नमुनेदार अंक काढल्याबद्दल अभिनंदन केलें. त्याच पत्रांत त्यांनीं डॉ. कस्ट्रो यांचें मुख्य प्रतिपाद्य-( Thesis ) च कसें डळमळीत आधारावर रचलेलें आहे याचें आंकडेवारी देऊन दिग्दर्शन केलें आहे. व्होग्ट यांच्या पत्रांतील तत्संबंधीं उतारा पुढें अनुवादून दिला आहे. श्री. व्होग्ट यांच्या पत्राचा ' नवभारता'करितां उपयोग करूं दिल्याबद्दल डॉ. कर्णिक यांचे मनःपूर्वक आभार.— गेल्या पाडव्याच्या दिवशीं नवीनच सुरूं झालेल्या 'महाराष्ट्र मेडिकल जर्नल'चे डॉ. कर्णिक हे संपादक आहेत. — का. सं. ]

डॉ. कॅस्ट्रो यांनीं आपल्या ग्रंथांतील आंकडे कोठून घेतले त्याचा निर्देश केलेला नाहीं. मी येथें त्यांच्या आंकड्यांची यादी घेतली असून त्यांत पुन्हां जे कांहीं देश कॅस्ट्रो यांनीं गाळले आहेत त्या देशांच्या आंकड्यांचीहि भर घातली आहे. जननसंख्येच्या प्रमाणाचे आंकडे मी संयुक्त राष्ट्रसंघाच्या सांवत्सरिकामधून (Demographic Yearbook of the United Nations, 1950-1951 ) घेतले आहेत, आणि प्रोटीनचें अन्नांतील प्रमाण दाखविणारे आंकडे अन्न-कृषि-संघटने-( FAO ) नें प्रसिद्ध केलेल्या माहितींतून [ ' Food and Agricultural Statistics ' ( सप्टेंबर १९५०. Vol. 3, No. 9 ) ] घेतले आहेत. कोष्टकांतील ( आंकड्यांचें कोष्टक पान ३९ वर पहावें. ) तारकांकित आंकडे कॅस्ट्रो यांचेच ठेविले आहेत. कारण मला विश्वसनीय आंकडे दुसरीकडून मिळाले नाहींत. या आंकड्यांवरून जर निष्कर्ष काढावयाचा झाला तर असें स्पष्ट दिसून येईल कीं जननसंख्येचें प्रमाण आणि प्राणिज प्रोटीन ( animal protein ) यांच्यामध्यें कार्यकारणसंबंध कांहींहि नाहीं. उदाहरणार्थ, मलायी संस्थानें, फोर्मोसा आणि सीलोन यांच्यापेक्षां मेक्सिकोमध्यें जननसंख्येचें प्रमाण जास्ती आहे आणि प्रोटीनचें अन्नांतील प्रमाणहि जास्ती आहे. तसेंच युगोस्लाव्हिआ, जपान आणि भारत यांच्यातल्यापेक्षां चिली या देशांतहि जननसंख्येचें आणि प्रोटीन-भक्षणाचें प्रमाण जास्ती आहे. कॅनडा, न्यू झीलंड, अर्जेंटिना, अमेरिका या देशांतून आहारांत भरपूर प्रोटीन असूनहि यांतील जननसंख्येचें प्रमाण अन्नामध्यें कमी प्रोटीन असलेल्या इटली आणि आयर्लंड या देशापेक्षां जास्तीच आहे.

आमच्या अमेरिकेच्या बाबतींत बघितलें तर असें दिसून येईल कीं, आमच्या जुन्या वसाहतीच्या काळांत आमचें अन्न प्रोटीननें भरपूर संपन्न होतें त्यावेळीं, आमच्या लोकसंख्यावाढीचें शेंकडा प्रमाण जास्तींत जास्त होतें. या शतकाच्या पहिल्या ५० वर्षांत सगळ्यांत जास्ती लोकसंख्यावाढीचें ( शेंकडा ) प्रमाण अर्जेंटिना या देशांत आढळून येतें, असें संयुक्त राष्ट्रसंघांतील एका प्रमुखानें म्हटलें आहे. अर्जेंटिनामधील ह्या लोकसंख्येच्या वाढीचें कारण बाहेरून येणाऱ्या लोकांची आयात हें एक असूं शकेल हें खरें. परंतु अर्जेंटिनामधील जननसंख्येचें प्रमाण नेहमींच जास्त आहे. प्राणिज प्रोटीनचें प्रमाण ज्यांच्या अन्नांत माणशी जास्तींत जास्त आहे, अशा जगांतील दोनतीन देशांमध्यें अर्जेंटिनाची गणना होते. अशी एक जुनी म्हण आहे कीं, आंकडे कधीं खोटें बोलत नाहींत. पण हे आंकडे कोणते आणि कसे आहेत यावर तें अवलंबून आहे.








मार्सेल एमे. अनु० श्री. गं. रा. पटवर्धन

# परमेश्वराची कृपा

[ प्रस्तुत लघुकथा **मार्सेल एमे** ( Marcel Ayme ) या फ्रेंच साहित्यिकाच्या ' La Grace ' या कथेचा अनुवाद आहे. La Grace ही कथा १९४४ सालीं प्रसिद्ध झाली. तिचा इंग्रजी अनुवाद ' पार्टिझन रिव्ह्यू'च्या मे-जून १९५२ च्या अंकांत आला आहे.

**मार्सेल एमे** – जन्म ( १९०२ ). यानें प्रारंभीं विमा-एजंट, गवंडी, विक्रेता इत्यादि व्यवसाय केल्यानंतर एका मोठ्या दुखण्यांतून त्याचा पुनर्जन्म झाला. त्यानें कादंबऱ्या लिहिण्यास सुरुवात केली. ' Les Tableaux-Creves' (१९२९) या शेतकरी जीवनावरील कथेमुळें तो प्रसिद्धीस आला. कांहीं अद्‌भुत कथा त्यानें लिहिल्या असल्या आणि करुण, रौद्र व भीषण आविष्कार त्याला वर्ज्य नसला तरी कांहींसा मिस्किल आणि द्वाड विनोद हा त्याचा स्थायी भाव आहे. कांहींतरी अघटित सुरवात करावयाची, पण नंतर मात्र पूर्णतया तर्काला पटेल अशी कथारचना करणें हें त्याचें खास वैशिष्ट्य आहे. तो विदूषकी पोषाख चढवतो तो वास्तवदर्शनासाठीं. प्रूस्त, झीद, कॉलेत, मोऱ्या ( Mauriac ) यांच्या तोडीचें जरी नाहीं तरी एक वैशिष्ट्यपूर्ण आणि मानाचें स्थान **एमे** यानें आधुनिक फ्रेंच कादंबरीकारांत मिळविलें आहे यांत शंका नाहीं. ' निनांवी रस्ता ' ( १९३० ), ' उडाणटप्पू ' ( १९३१ ), ' हिरवी घोडी ' ( १९३३ ), ' गुस्तालँ ' ( १९३७ ), ' भानगडीचा बैल ' ( १९३९ ) आदि कादंबऱ्या व अनेक कथासंग्रह त्यानें लिहिले आहेत.— **अनुवादक** ]

पारी (Paris) शहरांतली १९३९ सालची गोष्ट. गाब्रिएल रस्त्यावर राहणाऱ्या लोकांतच काय, पण साऱ्या मोंमार्त्रमध्यें देखील मसिअ द्युपेरिएसारखा सज्जन शोधून सांपडला नसता. इतका सदाचरणी, शुद्ध व पापभीरु मनुष्य देवाला कां नाहीं आवडणार ? देवाच्या निःसीम कृपेमुळें द्युपेरिएच्या मस्तकाभोंवतीं एक तेजाचें वलय चकाकूं लागलें होतें. जी गोष्ट इतर साधुसंतांना मरणोत्तरच लाभली ती द्युपेरिएनें ऐन तारुण्यांत मिळविली होती. एखाद्या जाड शुभ्र ताटलीप्रमाणें तें स्वर्गीय वलय चमकत होतें. त्या वलयाच्या सौम्य प्रकाशामुळें इतर माणसांना येणाऱ्या दिवसरात्रीच्या अनुभवाला द्युपेरिए पारखा झाला. पण त्याबद्दल द्युपेरिएला वाईटहि वाटलें नाहीं वा धन्यहि वाटलें नाहीं. तो आपला कृतज्ञतापूर्वक रोज देवाचे आभार मानी. त्याचा स्वभाव साधाभोळा व विनयशील. इहलोकीं हें तेजोवलय देऊन देवानें आपलें इतकें कौतुक केलें तर परलोकांत आपल्यासाठीं काय ठेवा ठेवला असेल अशा विचारांत कोणीहि दंग होऊन गेला असता. पण द्युपेरिएला असा विचार देखील शिवला नाहीं.

द्युपेरिएच्या हेवा वाटण्यासारख्या या भाग्यांत एकच उणीव होती. ती म्हणजे या ईश्वरी कृपेबद्दल त्याच्या पत्नीला व्हावा तसा आनंद झाला नव्हता. किंबहुना, जराशा त्रासिक मुद्रेनें ती एकदां म्हणाली : " हें तुमचें तेजोवलय चार माणसांत शोभून दिसेल का ? आजूबाजूचे शिष्ट लोक, रोजचे दुकानदार वगैरे मंडळी तर राहूंच द्या, पण माझ्या माहेरची माणसें काय म्हणतील ! लिओपोल्ड तर टिंगल केल्यावांचून मुळींच राहणार नाहीं. एवढा गर्व नको कांहीं तुम्हांला वाटायला ! आतां ही कायमची फजिती होणार आपली ! "

मादाम द्युपेरिए या सुस्वभावी होत्या. त्या भाविकहि होत्या. पण जग ही सारी माया आहे असें वाटण्याइतकी त्यांची परमार्थांत गति नव्हती. पुष्कळ लोकांना आपल्या भावना—सद्‌भावनासुद्धां— व्यावहारिक रहाटगाडग्यापुढें दडपाव्या लागतात. मादाम द्युपेरिएचें तसेंच होई. देवाजवळ आपली पत कशी कां असेना, पण वाण्याजवळ मात्र आपली पत चांगली पाहिजे, असा त्या बाईचा सोपा हिशेब होता.

एक आठवडा लोटण्यापूर्वींच या तेजोवलयाची भानगड शेजारच्या काकूंना किंवा दुधाचा रतीब घालणाऱ्या बाईला कशी सांगावी, या चिंतेनें ती ग्रस्त झाली. आणि

तिच्या स्वभावांतील मार्दव लोपूं लागलें. एकदां तर तिनें हळूंच आपल्या नवऱ्याभोंवतीं चमकणारें तें वलय पकडून, ओरबाडून काढावयाचा देखील प्रयत्न केला ! पण त्याचा काय उपयोग ? सूर्याचे किरण कुणी हातांत पकडून फेंकून देऊ शकलें आहे का ? भालप्रदेशापासून मानेपर्यंत जरासें तिरकस असलेलें तें तेजाचें वलय अगदीं पूर्वीप्रमाणेंच तरळत राहिलें. उलट, तिच्या या प्रयत्नामुळें तिच्या नवऱ्याचा चेहरा अभिमानानें विशेषच उल्हसित दिसूं लागला.

द्युपेरिएला आपल्या पत्नीची काळजी घेणें प्राप्तच होतें. तिला वाटणारी भीति, लाज व चिंता तो समजूं शकत होता. देवाची कृपा असीम व अथांग असते. या जगांतील लोक तिचा वेडावांकडाच अर्थ लावणार हें तो जाणून होता. द्युपेरिए आपल्याकडे कुणाचें लक्ष जाऊं नये अशी खबरदारी घेई. त्याच्या धंद्यांतील लोक जी टोपी वापरीत ती सोडून देऊन, इच्छेविरुद्ध त्याला एक वाटोळी फेल्ट हॅट घालावी लागली. ती टोपी मानेवर मागें कलती ठेवली म्हणजे तेजोवलय संपूर्ण झांकलें जाई; जरासा चकचकीतपणा वाटलाच तरी तो नवीन टोपीच्या रेशमी तकतकीत अस्तरासारखा खपून जाई. ती टोपी घालून तो ऑफिसमधील आपल्या सहकाऱ्यांपासून तो वरिष्ठ अधिकाऱ्यांपर्यंत तो निर्वेधपणें काम करूं शके. एका कांचेच्या लहान खोलींत तो एकटाच बसत असे. तो टोपी काढून ठेवीत नसे. द्युपेरिए कामाला लागल्यावरहि टोपी काढून ठेवीत नाहीं याचें कोणाला कुतूहल वाटलें नाहीं, निदान तें वाटलें असल्यास त्याला कोणी कांहीं विचारलें तरी नाहीं !

त्यानें एवढी सावधगिरी ठेवूनहि त्याच्या पत्नीचें समाधान झालें नाहीं. तिच्या मनानें आपलें घेतलें कीं हें तेजोवलय आतां सर्वत्र चर्चेचा विषय झाला असला पाहिजे. पूर्वीप्रमाणें ती आतां फारशी हिंडतफिरत नसे, जेव्हांकेव्हां बाहेर पडे तेव्हां तिच्या पोटांत सतत संशय व धाकधूक वाटत असे. आपल्या पाठीमागून लोक हंसतात कीं काय अशी शंका तिला येई. गरीब बिचारी ! चार सभ्य लोकांमध्यें आपण गणलें जावें व तद्वत् वागावें व राहावें एवढी साधी आकांक्षा उराशीं जिनें बाळगली, तिला ही तजोवलयाची आपत्ति प्रलयकाल आल्यासारखी वाटावी यांत काय आश्चर्य ! आपल्या नवऱ्याबरोबर बाहेर जाणें तिनें सोडून दिलें. एक काळ असा होता कीं रविवारीं दोघें पतिपत्नी ओळखीच्या लोकांकडे गप्पा मारायला जात. निदान संध्याकाळीं फिरायला तरी. पण आतां त्यांना एकमेकांचाच सहवास उरला. कंटाळवाणा सहवास ! प्रशस्त दिवाणखान्यांत एका टोंकाला बसून, हातांतील शिवणाकडे लक्ष न देतां, मादाम द्युपेरिए नवऱ्याच्या तेजःपुंज चेहऱ्याकडे तीक्ष्ण दृष्टिक्षेप टाकी. उलट द्युपेरिएचें सारें लक्ष धार्मिक पुस्तकांत गढलेलें. संध्याकाळच्या अस्पष्ट उजेडांत कधीं त्याला असा भास होई कीं आपल्याभोंवतीं देवदूत वावरत आहेत. त्या कल्पनेनें त्याचा चेहरा अधिकच उजळून निघे. तें पाहून त्याच्या पत्नीला अधिकच राग येई. अशा वेळीं त्या दोघांची नजरानजर झाली कीं द्युपेरिए एकदम खजील होई ! पण "देवाला काय वाटेल त्याच्याशीं ही कृतघ्नता तर होत नाहींना" हा विचार येऊन तो अधिकच शरमिंधा होई.

पुढें पुढें परिस्थिति यापेक्षां जास्त गंभीर होऊं लागली. द्युपेरिएबाईंना आपण शहाणे कीं वेडे हेंच कळेनासें झालें. तिच्या तक्रारींत भर म्हणून कीं काय तिला पुढें झोंप येईनाशी झाली. कारण रात्रीं अखंड तिच्या उशीवर तो दिव्य प्रकाश येत राही. दिवसां तो प्रकाश सौम्य वाटला तरी रात्रीं जरासा प्रखरच. द्युपेरिएची गोष्ट निराळी. मध्येंच जाग आल्यास तो बायबलचा एखादा भाग वाचण्यासाठीं त्या प्रकाशाचा उपयोग करी. त्याला बायकोची तक्रार सयुक्तिक वाटे व आपण तिचा कांहीं गुन्हा करीत आहों ही भावना त्याला सारखी टोंचूं लागली. शेवटीं एका साध्या प्रसंगानें गोष्ट वर्दळीवर आली. एकदां सकाळीं तो ऑफिसला निघालेला असतांना त्याच्या घराच्या जवळून एक प्रेतयात्रा जात होती. अलीकडे द्युपेरिएनें टोपी काढून अभिवादन करण्याचें सोडूनच दिलें होतें. तो नुसता टोपीला स्पर्श करी. पण आतां मृताला आदर दर्शविण्याच्या बुद्धीनें त्यानें टोपी काढली व मस्तक लवविलें. दुकानें उघडण्याची वेळ झाली होती. दुकानदार दाराशीं जांभया देत उभे होते. पण हा चमत्कार पाहतांच त्याची चर्चा करण्यासाठीं त्यांचें कोंडाळें जमलें. द्युपेरिए कामावर निघून गेला व थोड्या








वेळानें त्याची पत्नी बाजार करण्यासाठीं बाहेर पडली. लोक तिची वाटच पाहत होते. पण त्यांच्या चौकशीला तिनें अशा तऱ्हेनें व तोऱ्यानें उत्तरें दिलीं कीं लोक सर्दच झाले! दुपारीं नवरा जेवायच्या वेळेला परत आला तेव्हां तिचा फणकारा पाहून तो थक्कच झाला! ती त्याच्या अंगावर खेंकसली – " तें तेजोवलय काढून या पाहूं अगोदर! अगदीं या क्षणाला, आतांच्या आतां!" – तिचा आवाज चढला होता. पण तिला द्युपेरिए शांतपणें म्हणाला "ही गोष्ट आपल्या हातांतील नव्हे. आपला नाइलाज आहे!" ती ओरडली : "नाइलाज म्हणे! नाहीं, माझ्याविषयीं तुम्हांला कांहीं वाटत नाहीं! किती किती स्वार्थी आहां तुम्हीं!"

यावर त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. पण त्याच्या मनांत एक विचार चमकून गेला. तो विचार पक्का होण्यासाठीं आणली एक प्रसंग घडायला हवा होता. दुसऱ्याच दिवशींची गोष्ट. तो पहांटे देवळांत जात असे. देवळांत गेल्यावर टोपी डोक्यावर ठेवणें योग्य नसे. पण त्यानें पसंत केलेलें देऊळ इतकें भव्य होतें कीं जर दुसरें कुणी आलेंच तर एखाद्या खांबामागें दडणें शक्य व्हावें! द्युपेरिएची देवदर्शनाची वेळहि अशी होती कीं त्या वेळेला इतर फारसें तेथें कोणी नसे. त्या दिवशीं मात्र त्याची नेहमींची युक्ति साधली नाहीं. प्रार्थना संपल्यावर एक मध्यम वयाची श्रद्धाळु कुमारी 'जोसेफबाबा' अशा हांका मारीत त्याच्या पायाशीं येऊन तिनें लोटांगण घातलें. द्युपेरिए कसाबसा निसटला. पण ती स्त्री त्याच्याच आळींत राहत असे. थोड्याच वेळानंतर ती त्याच्या घरींच आली.

'जोसेफबाबा' ही नवीन पदवी ऐकून मादाम द्युपेरिएच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. सर्व साधुसंतांमध्यें जोसेफ हा बावळटपणाविषयीं प्रसिद्ध आहे. सालस असला तरी पण गबाळच. त्यांत पुन्हां दोन जोसेफांचा सामान्य लोक घोटाळा करतात. एक जोसेफ संत होता. दुसऱ्या जोसेफविषयीं अशी आख्यायिका आहे कीं पॉटीफारच्या पत्नीनें टाकलेल्या मोहक जाळयांत न अडकतां तो दूर पळून गेला होता! त्या जोसेफची स्मृति होतांच द्युपेरिएबाईचा कोप अनावर झाला व पाहुण्या स्त्रीवर ती छत्री सरसावून धावली. छत्री उगारतांना इतर वस्तूंचा चुराडा झाला त्याची तिनें क्षिति बाळगली नाहीं. नवरा घरीं आल्यावर ती क्षीणपणें त्याला म्हणाली : "आतां शेवटचें सांगतें! – तें तेजोवलय तुम्हीं काढून कां टाकीत नाहीं? -- अगदीं सोपें आहे तें करणें. आणि तें सोपें आहे हें तुम्हांलाहि माहीत आहे!" त्याला तिची रुखरुख कळली पण शब्दांनीं मनोगत समजावून घेण्याचें धाडस त्याला होईना. पण तीच पुढें म्हणाली -- "आहे काय त्यांत? पाप केलें कीं झालें!"

द्युपेरिए निजायच्या खोलींत गेला व भक्तिभावानें प्रार्थना करूं लागला. प्रार्थनेचा आशय असा होता " हे देवा, माझ्या भाग्याहून थोर असें भाग्य फक्त हुतात्म्यांचेंच. – तुझ्या दयेला सीमा नाहीं. पण माझ्या नशिबाची वांटेकरीण जी तूं मला दिली आहेस तिला हें तेजोवलय सहन होत नाहीं. त्यांत तुझा अपमान करावा अशी तिची इच्छा नाहीं. पण हें तेजोवलय नाहीं तिला खपत! देवा, तूं स्त्रीचें मन जाणतोस. स्त्रियांच्या डोळयांत हजारों लहानमोठ्या योजना जतन करून ठेवलेल्या असतात. कुठल्याहि अनपेक्षित गोष्टीनें त्या धुळीला मिळतात. त्यांचा त्रास मग कांहीं केल्या कमी होत नाहीं. शंभर वर्षें पाहूनहि माझ्या पत्नीला हें तेजोवलय संवयीचें वाटणार नाहीं. भक्तवत्सला, मला माझ्या स्वतःच्या क्षुद्र सुखाची पर्वा नाहीं. पण माझ्या पत्नीला जीवनांत रस वाटला पाहिजे असें कर! कोण जाणे, एक दिवस ती तुलाच शिव्या देऊं लागेल! आपली बायको नरकांत पिचावी असें कुणाला बरें वाटेल? या पेंचांतून तूंच मला मार्ग दाखव."

तत्काळ त्याच्या विवेकबुद्धीनें निर्णय दिला कीं पापाचरण हाच प्रेमाचा मार्ग होय. तो दिवाणखान्यांत आला. पत्नी त्याची वाट पाहतच होती. खिशांत हात घालून, शीळ घालीत त्यानें प्रवेश केला. तो म्हणाला : " देव न्यायी आहे. त्यानें मला इतर संतांहूनहि अधिक मान दिला यांत त्याची चूक काय? माझ्या पासंगाला तरी ते पुरतील का? आणि या जगाच्या बजबजपुरीकडे पाहिलें कीं किळस येतो. प्रत्यक्ष देवानें माझा सन्मान केला—पण चर्चनें मला काय दिलें? कांहीं नाहीं! शीः!"

पापांच्या राशींतून द्युपेरिएनें अहंकाराची, गर्वाची निवड केली होती. त्याचा अंतःस्थ हेतु असा होता कीं स्वतःची बढाई मारतां मारतां देवाचीहि स्तुति करतां



अनुक्रमणिका






यावी. त्याच्या बोलण्याचा रोंख त्याच्या भार्येला उमगला. त्याच्या पापाचरणांत तिनें आपला वांटा उचलला. " माझा भाऊ लिओपोल्ड श्रीमंत असेल पण तुमच्या नखाची त्याला सर येणार नाहीं ! " " माझेंहि तेंच म्हणणें आहे. पैसा काय, कुणीहि मिळवील. माझा मान तर पाहा. पैसा म्हणजे मातीच ती ! लोकांना डोळे आहेत पण दिसत नाहीं. अज्ञानाच्या अंधारांत चांचपडतात बिचारे ! "

त्या क्षणीं जरी अहंकाराच्या, प्रौढीच्या या शब्दांमागें थोडा भावनेचा उमाळा असला तरी कांहीं दिवसांनीं ते शब्द निर्जीव झाले. ती एक संवयच झाली. शब्दांचा प्रभाव असा असतो कीं द्युपेरिएला आत्मप्रौढींत कांहीं चूक वा अयोग्य आहे असें वाटेनासें झालें. त्याचा सहवास सर्वांना अप्रिय झाला. पण त्याच्या पत्नीच्या डोळ्यांना त्याच्या डोक्याभोंवतालचें तेजोवलय आत्मप्रौढीच्या पापानेंहि मंद होत आहे असें दिसलें नाहीं. तिच्या मनांत असा विचार आला कीं गर्व हें कांहीं मोठें पाप नव्हें. तिने तो द्युपेरिएला बोलून दाखविला. त्याला तो पटला. " मी मुळीं खरें तेंच बोलतों—त्यांत गर्वाचा लवलेशहि नाहीं."– आतां पुढील पाप खादाडपणाचें–जिभेचे चोंचले पुरविण्याचें करावें असा त्यानें निश्चय केला. या पापानें तेजोवलय नष्ट होईलच, शिवाय चित्रगुप्तहि फार वाईट नोंद करून ठेवणार नाहीं, असा त्यांत त्याचा धूर्त कावा होता. बालपणीं चॉकलेटवर ताव मारल्याबद्दल मिळालेल्या माराची त्याची स्मृति जागृत झाली. मोठ्या आशेनें त्याची पत्नी रोज नवीन नवीन पक्वान्नें बनवी. जेवणांत हरतऱ्हेच्या गोड गोड पदार्थांची रेलचेल असे. एका एका जेवणाला त्याला दुप्पट वेळ लागूं लागला. हनुवटीखालीं मांसाचे गोळे लोंबूं लागले. अजीर्ण व उचकी रोज पीडा देऊं लागली. त्याची जीभ इतकी माजली कीं लहानसहान चुकांसाठीं तो बायकोवर ताशेरे झाडी ! कांहीं दिवसांनीं ती म्हणूं लागली : " माझ्या अन्नानें त्या तुमच्या तेजोवलयाला जास्तच प्रभा चढत आहे ! कोणालाहि विचारा –तें कमी तर नाहींच होत ! खादाडपणा हें पाप नसावें. खर्च मात्र वाढला आहे ! पूर्वींसारखी भातभाजी खाल्लेली बरी ! " " भातभाजी ! " तो ओरडला— " और स्त्री आहेस. तुझ्यासाठीं माझा आत्मा केवढ्या नरकयातना अनुभवीत आहे ! आणि त्याचा हा मला बदला देतेस ! छान ! असें शब्द बोलणाऱ्याचें खरोखर तोंड रंगवून काढलें पाहिजे ! "

पापाचा मार्ग निसरडा असतो. एका व्यसनानें दुसरीं जडतात. क्रोधाचें आचरण त्याच्या न कळत होऊं लागलें. शांत वर्तनाबद्दल नांवाजला जाणारा द्युपेरिए आतां शिवीगाळ करूं लागला, आदळआपट करूं लागला. क्वचित् पत्नीला त्याच्या हातचा प्रसादहि मिळूं लागला. पण मौज ही कीं पूर्वीच्या पापांमध्यें ही इतकी भर पडून सुद्धां तें वलय निष्प्रभ होईना ! मादाम द्युपेरिए बिचारी सुन्न होऊन गेली. यावरून, देवाची करुणा किती विशाल असावी हा विचार तिच्या मनांत येऊन गेला. द्युपेरिएला मात्र आपल्या कर्तव्याची पूर्ण जाणीव होती. क्रोधानें जेव्हां देवाच्या करणींत बदल झाला नाहीं तेव्हां त्यानें मत्सराचा अंगीकार केला. खरें पाहतां मत्सरानें या आधींच त्याच्यांत प्रवेश केला होता. अति-जेवणानें पचनक्रिया नीट झाली नाहीं कीं सामान्यतः आपल्यावर सर्वत्र अन्याय होत आहे ही भावना वाढीस लागते. मग मत्सर वाटण्यास काय उशीर ? द्युपेरिएच्या मत्सरभावनेला पुष्ट व्हायला विस्तृत क्षेत्र होतें -- त्याचा वरिष्ठ अधिकारी, त्याचे नातेवाईक, त्याचे शेजारी, वर्तमानपत्रांत झळकणाऱ्या व्यक्ती. कोणाचे भलें झालें कीं त्याचा पोटशूळ उठे.

पण तरीहि तेजोवलय कमी होण्याचें चिन्ह दिसेना ! इतकीं पापें करूनही परिणाम शून्य ! द्युपेरिएला याचें आश्चर्य वाटलें नाहीं. आपलीं पापें हीं पापें नव्हेतच असें त्याला सहज वाटलें व सहजच पटलें. त्यानें कारणेंहि पुष्कळच शोधून काढलीं: "हा खादाडपणा नसून आपली भूकच वाढली आहे; द्वेष हा न्यायबुद्धीचा प्रकर्ष आहे " इत्यादि.

त्याची पत्नी उद्गारली: " देव भारीच दयाळु, बाई. इतक्या तुमच्या वाईट वर्तनाचा त्याला राग नाहीं. मग माझ्यासारख्या लोकांना नरकाचा एवढा बाऊ कां वाटावा ? " तो रागावून म्हणाला " गप्प बस. " -- हल्लीं क्रोधाचें प्राबल्य होतें. " सच्छील माणसानें पाप करावें आणि तुम्हीं त्याची चेष्टा करावी. " तो उद्गारला.

द्युपेरिएच्या वागण्यांत व विचारांत फार फरक








झाला. पूर्वी त्याची स्वर्गाविषयीं कल्पना अशी होती कीं तेथें ढगांवर बसून आनंदानें देवाचा महिमा खुशाल आळवीत बसावें. आतां स्वर्ग म्हणजे एक प्रचंड खाणावळ असेल असें त्याला वाटे. 'जड'-वादाचा त्याच्यावर पगडा बसला. त्याचें शरीर जड झालें व जीभहि जड झाली. त्याच्या भवितव्याची त्याच्या पत्नीला काळजी वाटूं लागली. पण त्या अघटित तेजोवलयाविषयींची तिची तक्रार मात्र कायमच होती.

यानंतरचें पाप म्हणजे आळस. त्याचें आकर्षण द्युपेरिएला साहजिक वाटलें. त्यासाठीं विशेष निश्चयाचें बळ लागलें नाहीं. ऑफिसांतील काम आपल्या जोगतें नाहीं असें तर वाटतच होतें. शिवाय वामकुक्षीच्या गरजेमुळें कामाचा उरकहि कमी होऊं लागला होता. गर्वाच्या भरांत तो आपण कशांतहि-पापांतहि-कमी आहों हें कबूल करीना. अखेर एक दिवस त्याला नोकरीवरून कमी करण्यांत आलें. 'अच्छा' म्हणण्यासाठीं त्यानें टोपी उचलली.

वरिष्ठ म्हणालाः– "तें कपाळाभोंवतीं काय आहे ?"

तो उत्तरला– "साहेब, तें तेजाचें वलय आहे !"

"तरीच ! आंकडेमोड करायची सोडून हीं वर्तुळें कशाला जमवतां आहांत." – ही बातमी पत्नीला सांगितल्यानंतर ती हताशपणें म्हणाली – "आतां काय करणार ?" तो म्हणालाः "कंजूषपणा."

पण जो जन्मतः लोभी नाहीं त्याला कंजूषपणा जमणें कठीण. पण चिकाटीनें व दीर्घप्रयत्नानें ती गोष्ट त्याला साध्य झाली. प्रथम लोक त्याची 'हा पैसे वांचवतो' म्हणून स्तुति करीत. पण नंतर त्याच्या चिक्कूपणाची दुष्कीर्ति चहूंकडे पसरली. एका चैतन्यमयी शक्तीला कडीकुलुपांत डांबून ठेवण्याचा अघोरी आनंद तो उपभोगूं लागला. याहि पापांतील प्रगति पाहून त्याच्या पत्नीला हुरूप आला. पुढें एक वेळ अशी आली कीं आंधळ्याला तो खोटे पैसे देई व फंडाच्या पेट्यांत तुटलेलीं बटणें टाकी. तरीहि त्याचें तें तेजोवलय कायम राहिलें. तें पाहून त्या दोघांना अतिशय दुःख झालें. आतां मात्र मार्ग खुंटला असें त्यांना वाटलें.

इतकीं पापें करूनहि मनांतल्या मनांत द्युपेरिएला 'आपण अजून निष्पाप होऊं' असें वाटे. आतापर्यंतचीं पापें तितकीं भीतिदायक नव्हतीं. पण याहिपुढचें जें पाप म्हणजे कामवासना, तिला बळी जाण्याचा त्याचा मुळींच इरादा नव्हता. बाकीचे रिपू हे कामरिपूच्या मानानें देवाच्या खिजगणतींतहि नसतील. पण काम हा सैतानाचा जणूं भाऊ ! कामवासनेनें शरीरासक्ति निर्माण झाली कीं त्या शरीराला नरकांत काय यातना भोगाव्या लागतील याच्या नुसत्या कल्पनेनें तो शहारून जाई. पापांच्या यादींत विषयवासनेचें पाप शेवटीं राखून ठेवावें असा त्याचा विचार नव्हता. आतांपर्यंत त्यानें हा दुर्गुण मनांतून अजिबात काढूनच टाकिला होता. लग्नानंतर त्यानें यथाशक्ति ब्रम्हचर्याचें पालन केलें होतें. कदाचित् त्यामुळेंच त्याला तें दिव्य तेजोवलय प्राप्त झालें असेल ! हा विचार मनांत आल्याबरोबर मादाम द्युपेरिएला विलक्षण चीड आली. कमळाप्रमाणें शोभणारें हें तेजोवलय चिखलांत गाडलें जाईल तर बरें असें तिच्या मनांत आलें व कामवासना तें घडवून आणूं शेकल असा तिला विश्वास वाटला.

मोठ्या शर्थीनें व प्रयासानें तिनें नवऱ्याचें मन यापुढील पापाचरणाला प्रवृत्त केलें. कर्तव्याची जाणीव तीव्र झाली म्हणूनच तोहि वळवला जाऊं शकला. त्याच्या पत्नीला त्याच्या अज्ञानाची कल्पना होती. म्हणून तिनें त्याच्यासाठीं एक पुस्तक विकत घेतलें. स्वैराचाराची त्यांत सचित्र व सुबोध माहिती होती. त्याची भीड चेपली जाण्याकरितां तीं दोघें एकत्र तें पुस्तक वाचीत. त्या दृश्यानें खरोखरींच पाहणाऱ्याच्या डोळ्यांना पाणी यावें ! पण हें सर्व पुस्तकी ज्ञान आचरणांत कसें आणावें हा बिकट प्रश्न उरलाच. घरची दारा कीं दारची जारिणी असा त्याच्यापुढें पर्याय होता. घरीं राहण्यानें पैसा खर्च झाला नसता. पण द्युपेरिएचें मत असें होतें कीं असल्या अनाचारानें तिची प्रकृति खराब होईल. म्हणून या वाटेंतील सर्व धोके आपण एकट्यानेंच पत्करावे असें त्यानें मोठ्या धैर्यानें ठरविलें.

यापुढील सर्व रात्री त्यानें वेश्यांच्या वस्तींत घालविल्या. त्याच्या तेजोवलयाचा कधीं कधीं त्याला व त्याच्या नवीन मैत्रिणींना त्रास होई. सुरुवातीला तो क्रियाप्रमाणें पुस्तक बघत असे. त्यामुळें त्याच्या कृत्यांत उत्साह वा आनंद नसे. पण त्याची अहंकारभावना एवढी तीव्र कीं त्याला कुठलीहि गोष्ट अपूर्ण राहूं देणें तिला सहन होईना. जशीजशी विषयवासनेची गोडी वाढूं लागली, तसतसे पैसे फेंकून देणें आवश्यक झालें.








त्याच्या कंजूष आत्म्याला त्यामुळें क्लेश होऊं लागले.

एकदां तो असाच पिगाल चौकांत भटकत असतांना त्याला मारी जानिक नांवाची तरुणी भेटली. मारी फार गरीब व देवभोळी होती. रोजगार मिळविण्यासाठीं ब्रितनी प्रांतांतून ती शहरांत आली होती. एका घरीं मिळालेली मोलकरणीची नोकरी मालक नास्तिक व क्रांतिवादी असल्यामुळें तिनें सोडून दिली होती. गेले कित्येक महिने ती या व्यवसायांत कसेंबसें पोट भरीत होती. तिच्या मनावर द्युपेरिएच्या सात्त्विक तेजोवलयाचा चटकन् परिणाम झाला. द्युपेरिए हा महान् संत, रेनाच्या किंवा संत आईव्हच्या तरी तोडीचा असला पाहिजे अशी तिची श्रद्धा बसली. आणि त्याचा फायदा द्युपेरिएनें उचलला.

आज मी ही घटना निवेदन करीत आहे या घटकेला देखील तुम्हीं बुलेव्हार द क्लिशीच्या रोखानें चक्कर टाकली तर गिऱ्हाइकांच्या शोधांत असलेली मारी जानिक तुम्हांला दिसेल. उन्हाळा-हिवाळा, तेजीमंदी, युद्ध-शांति – कांहींहि असलें तरी तिच्या कार्यक्रमांत खंड नाहीं किंवा फरक नाहीं. विशीची तिशी झाली इतकेंच. सायंकाळच्या लांबत जाणाऱ्या सावल्यांत कदाचित् कांहींतरी चकाकल्याचा तुम्हांला भास होईल. शनीप्रमाणें जानिकच्या मागें द्युपेरिए उभा आहे. आपलें तेजोवलय लपवण्याचा तो यत्किंचित्हि प्रयत्न करीत नाहीं. सप्तपापांनीं भारावलेला, सर्व लाज कोळून प्यालेला द्युपेरिए जानिकवर पैसा कमावीत आहे. तिला कंटाळा आला तरी टोंचून टोंचून तो तिला पुढें करतो. तिला गिऱ्हाईक मिळालें कीं आपला हिस्सा राखण्यासाठीं दरवाज्यावर तो पहारा करतो. पण त्या कर्दमांत लोळणारें त्याचें अंतःकरण अधूनमधून पुटपुटतें – " देवाच्या दयेला पार नाहीं ! "

---

[ पान ३३ वरून पुढें चालू ]

## जननसंख्येचें प्रमाण आणि आहारांतील प्रोटीनचें प्रमाण

| देश | जननसंख्येचें प्रमाण | दररोजच्या अन्नांत प्राणिज प्रोटीनचें प्रमाण ( ग्रॅम ) |
|---|---|---|
| मेक्सिको | ४५·७ | १६ |
| मलायी संस्थानें | ४२ | ७·५ * |
| फोर्मोसा | ४०·७ | ४·७ * |
| सीलोन | ४०·३ | ११ |
| चिली | ३२·४ | २३ |
| युगोस्लाव्हिआ | ३०·२ | ११·२ * |
| जपान | २८·४ | ८ |
| भारत | २६·७ | ६ |
| कॅनडा | २६·६ | ५७ |
| ग्रीस | २६·१ | १५ |
| दक्षिण आफ्रिका | २५·७ | २७ |
| अर्जेंटिना | २४·९ | ६६ |
| न्यू झीलंड | २४·६ | ६५ |
| बल्गेरिआ | २४ | १६·८ * |
| युनायटेड स्टेट्स | २३·४ | ६० |
| आस्ट्रेलिआ | २३·३ | ६४ |
| नेदर्लँड्स | २२·७ | ४० |
| आयर्लंड | २१ | ४९ |
| इटली | १९·६ | १९ |
| डेन्मार्क | १८·६ | ५७ |
| स्वीडन | १६·४ | ६० |








प्रा. ग. ना. जोशी

# नेतृत्व आणि लोकशाही

' नेता ' हा शब्द ' अनुयायी ' या सापेक्ष शब्दाशीं संलग्न आहे व दोघेहि परस्परावलंबी आहेत. अनुयायां-शिवाय नेता संभवूं शकत नाहीं व नेता नसल्यास अनुयायी असूं शकत नाहींत. नेता समजावयाचा असल्यास त्याच्या अनुयायांचेंहि ज्ञान असावयास हवें. ज्याच्यामागें कोणी नाहीं व ज्याचा कोणाशींहि संबंध नाहीं असा मनुष्य नेता होऊं शकत नाहीं. सामान्यतः जी व्यक्ति कांहीं एका हेतूनें प्रेरित होऊन व कांहीं निश्चित उद्दिष्ट समोर ठेवून तें हस्तगत करण्यासाठीं आपल्यामागें संघटित जनशक्ति उभी करते व तिला स्वतः मार्गदर्शन करून तें उद्दिष्ट प्राप्त करून देण्यासाठीं खटपट करते त्या व्यक्तीला ' नेतृत्व ' किंवा नेतेपण प्राप्त होतें. असें नेतृत्व राजकीय, सामाजिक, धार्मिक, नैतिक, आर्थिक, बौद्धिक अशा विविध क्षेत्रांत असतें. सामान्यतः प्रत्येक क्षेत्रांत स्वतंत्र नेते असतात. कांहीं वेळां एकच नेता या सर्व किंवा यांपैकीं अनेक क्षेत्रांत नेतृत्व करीत असतो. ज्यावेळीं जीवनाच्या सर्व अंगांत एकच नेता आपलें अबाधित नेतृत्व करीत असतो तेव्हां त्याची एकप्रकारच्या सर्वंकष हुकुमशाहींत परिणति होत असते. फासीवाद-( Fascism ) मध्यें याची स्पष्ट प्रतीति येते. अशा सर्वंकष नेतृत्वांत सत्तेचें कमालीचें केंद्रीकरण होत असतें व त्यामुळ समाजांत आपल्या सत्तेच्या जोरावर तो अनियंत्रित हुकुमत गाजवीत असतो. नेता जेवढा जास्त प्रभावी व सत्ताभिलाषी असेल तेवढी त्याच्या समाजांतील अनुयायांत मानसिक, बौद्धिक व शारीरिक गुलामगिरी अधिक असते. अशा सर्वंकष नेतृत्वाच्या समाजांत अनुयायांना नेत्याच्या विचारांची व कृत्यांची इष्टानिष्टता ठरविण्याचें बौद्धिक स्वातंत्र्य नसतें व अनिष्ट गोष्टीं-विरुद्ध आपलें मत प्रतिपादन करून त्यांचा निषेध करून नेत्याला विरोध करण्याचें स्वातंत्र्य नसतें. सर्वंकष नेता ( Dictator ) आपल्या अनुयायांत मेंढरी वृत्ति निर्माण करून दंडशाही व सामाजिक संमोहन ( hypnotism ) यांचा वापर करून आपलें नेतृत्व कायम टिकविण्याचा प्रयत्न सतत करीत असतो.

## जन्मजात कीं परिस्थितिसापेक्ष ?

तात्त्विक दृष्ट्या व धर्माच्या दृष्टीनेंहि पूर्वीं असें समजलें जात होतें कीं नेता हा जन्मजात असतो. त्याच्याठिकाणीं कांहीं दैवी गुण असतात व नेतृत्व करण्यासाठींच तो जन्माला येत असतो व त्याला जन्म देऊन पृथ्वीवर आणण्यांत कांहीं एक ईश्वरी योजना व ईश्वरी संकेत असतो. ईश्वरी इच्छेनुसार ती व्यक्ति नेतेपण करीत असते. अशा या सिद्धान्ताप्रमाणें नेतृत्वा-भोंवतीं गूढतेचें वलय निर्माण करण्यांत येतें व अनुयायांना नेतृत्वाच्या इष्टानिष्टतेचा विचार करावयास वाव व स्वातंत्र्य उरत नाहींत; कारण नेता हा ईश्वरी-संकेतानें ठरविला जातो व ईश्वरी योजनेविरुद्ध जाणें हें अपूर्ण मानवी शक्तीस पापरूप व अयोग्य ठरतें. भगव-द्गीतेंत म्हटलें आहे कीं "यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत...... धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे ॥" ज्या ज्या वेळीं समाजांत अनाचार बोकाळतात व सामाजिक जीवनांत अन्याय व अधर्म माजून त्याचा ऱ्हास होऊं लागतो त्याच्या वेळीं लोकांत धर्माविषयीं प्रेम व आदर निर्माण करण्यासाठीं व नव्यानें सामा-जिक जीवन शुद्ध करून समाजास उन्नत करण्यासाठीं प्रभु जन्म घेत असतो. प्रभूच्या अशा या धर्मसंस्था-पनेच्या कार्यासाठीं पृथ्वीवर जन्म घेण्यास ' अवतार ' होणें असें म्हणतात. अशा रीतीनें नेत्यास प्रभुप्रेषित समजून त्याला विभूतिमत्त्व देण्याची प्रवृत्ति पूर्वीच्या विचारांत प्राबल्यानें होती. आतां नवीन वास्तविक ( realistic ) दृष्टीनें पाहतां नेता हा अनुयायां-कडून बनविला जातो.

याउलट, भौतिकवादी म्हणतात कीं ज्यावेळीं सामा-जिक परिस्थितीला अमुक एक गरज लागते व ती अति तीव्रतेनें भासूं लागते तेव्हां ती गरज भागविण्या-साठीं व यशस्वी रीतीनें परिस्थितीला प्रत्युत्तर देण्या-साठीं योग्य अशा व्यक्तीचा जन्म होत असतो. परि-स्थिति आपणांस हवा तसा नेता निर्माण करीत असते. वाटेल त्यावेळीं वाटेल तो मनुष्य वाटेल त्या प्रकारचें नेतृत्व करीत नसतो तर नेत्याचा उदयहि परिस्थित्य-नुरूप होत असतो व तें नेतृत्व परिस्थिति-सापेक्ष असतें.








## वैयक्तिक गुण व परिस्थिति यांचा मेळ

या विचारप्रणाली एकांगी आहेत. काळाच्या गरजेप्रमाणेंच नेतृत्व तयार होत असतें व तसें तें तयार व्हावें लागतें हें निस्संदेह आहे. अयोग्य वेळीं जर अयोग्य तत्त्व कोणी सांगूं लागला तर त्यावेळीं एकूण जनमताची तयारी झालेली नसल्यामुळें साहजिकपणें तें तत्त्व स्वीकरणीय होत नाहीं, म्हणजे त्याला अनुयायी मिळत नाहींत व अनुयायी नसल्यानें साहजिकपणें नेतृत्व निर्माणच होत नाहीं. जनमनाची गरज जशी तीव्र होत जाते तशी ती मुखरित करावयास व भागविण्यास तिची बौद्धिक रीतीनें मांडणी करून तिची पूर्ति करण्यासाठीं जनमत संघटित करण्याची आवश्यकता अधिक तीव्रतेनें भासूं लागते. हें काम करण्यास धैर्यानें जी व्यक्ति किंवा ज्या व्यक्ती तयार होतात व वाटेल तो त्याग करावयास तयार राहून जुनी प्रथा मोडून नव्याचा आचार करावयास स्वतः सुरवात करून इतरांना स्फूर्ति देतात, अशा व्यक्तींकडे साहजिकपणें नेतृत्व जातेंच. अर्थात् अशा नेतृत्वपदीं आरूढ होणाऱ्या व्यक्तीच्या ठिकाणीं प्रखर बुद्धिमत्ता, ध्येयप्रीति, धैर्य, साहस, प्रसंगावधान, समयज्ञता, संघटनाचातुर्य, लोकप्रीतिसंपादनक्षमता, लोकसंग्रहवृत्ति, त्यागवृत्ति, आत्मविश्वास इत्यादि गुण असावेच लागतात. बौद्धिक व मानसिक दृष्ट्या दुबळ्या व्यक्ती कधींच नेतृत्व करूं शकत नाहींत. परंतु हे गुण अंगीं असणाऱ्या अनेक व्यक्ती समाजांत असूनहि त्या सर्वच व्यक्ती कांहीं 'नेते' होऊं शकत नाहींत. एकूण सभोंवतालच्या परिस्थितीची भूमिकाहि अशी अनुकूल रीत्या तयार व्हावी लागते कीं त्या त्या सामाजिक गरजा भागवण्यासाठीं जे उपाय ती व्यक्ति सुचवील ते लोकांना पटले पाहिजेत व लोकांनीं तिच्यावर आपली श्रद्धा एकत्रित केली पाहिजे. साधारणपणें लोकांना ज्या गोष्टी अत्यंत तीव्रतेनें हव्या असतात त्या वस्तू प्राप्त करून देण्याची हिंमत व मार्ग त्या व्यक्तीजवळ असले पाहिजेत व लोकांचें उद्दिष्ट हमखास आपण प्राप्त करून देऊं शकूं असें आत्मविश्वासानें आश्वासन व वचन तिनें जनतेस दिलें पाहिजे. अनेक लोक अनेक मार्ग सुचवितात, पण सर्वच कांहीं बरोबर लागूं पडत नाहींत व त्यामुळें बरेचसे लोक व मार्ग अपयशीहि ठरतात. अनेक मार्गांपैकीं जर एकच मार्ग खरोखर व्यवहार्य असेल व केवळ तोच यशस्वी होऊन जनतेचें उद्दिष्ट साध्य करून देऊं शकत असेल तर तोच मार्ग जनता स्वीकारण्याची अधिक शक्यता असते व साहजिकपणें त्या मार्गानें जनतेचें आंदोलन नेणाऱ्या व्यक्तीकडे नेतृत्व आपोआप जात असतें. नेतृत्व करणें हें केवळ कोणा व्यक्तीच्या इच्छेवर किंवा तिच्या कांहीं अंगभूत गुणावर नसतें तर तें प्रामुख्यानें तत्तत्कालीन वास्तविक परिस्थितीवर अवलंबून असतें. जॉन मोर्ले आपल्या 'On Compromise' या पुस्तकांत म्हणतो कीं नेतृत्व व्यक्तीच्या अंगभूत गुणावर अवलंबून नसतें, तर जी व्यक्ति समाजाच्या आशा-आकांक्षा योग्य रीतीनें मुखरित करूं शकेल व लोकांना विचारांचें व भावनांचें आश्वासन देऊन यशस्वी मार्ग दाखवूं शकेल तिच्याकडेच तें जात असतें. जेव्हां आवश्यक वैयक्तिक गुण व अनुरूप सामाजिक परिस्थिति यांचा अचूक मेळ बसतो तेव्हांच त्यांतून यशस्वी नेतृत्वाचा उगम होऊं शकतो. हा केवळ योगायोगच असतो. संघटित लष्करी सत्तेनें अत्यंत शक्तिमान् असलेल्या ब्रिटिश सत्तेला हिंसक व अत्याचारी मार्गानें तोंड देण्यांत व त्या मार्गानें स्वातंत्र्य प्राप्त करण्यांत सशस्त्र क्रांतिकारकांना अपयश आल्यावरच व त्या मार्गाचें वैफल्य बरोबर पटल्यावरच निःशस्त्र हिंदी जनतेपाशीं दुसरा प्रभावी इलाज न उरल्यामुळें, त्याचवेळीं महात्मा गांधींनीं दाखविलेला अहिंसात्मक अनत्याचारी असहकाराचा व सत्याग्रहाचा मार्ग चटकन् लोकांना पटला व तो अत्यंत प्रभावी रीतीनें यशस्वी करण्याचे पुरेसे गुण गांधीजींच्या अंगीं असल्यानें त्यांस फारच अल्पावधींत एवढें प्रचंड अनुयायित्व मिळूं शकलें. परिस्थिति परिपक्व असली व तिला योग्य रीतीनें वळण देण्याचा मार्ग व्यक्तीजवळ असला तर फारच अल्पावधींत व्यक्तीस असें नेतृत्व व लोकप्रियता मिळूं शकते. याउलट अनुयायांच्या गरजा, आकांक्षा व भावना न ओळखतां आपल्याला वाटतें तेंच हेकटपणानें अनुयायांच्या माथीं मारणाऱ्या नेत्यांचें नेतेपण फार काळ टिकूं शकत नाहीं; तें अल्पावधींत झुगारलें जातें व ती व्यक्ति वेळ पडल्यास जीविताच्या धोक्यांतहि पडूं शकते. अशीं अनेक उदाहरणें मानवजातीच्या इतिहासांत सांपडतात.

नेतृत्वाची इष्टानिष्टता व यशापयश हीं प्रामुख्यानें परिस्थितिसापेक्ष असतात. कोणतेंहि नेतृत्व कायम टिकविण्यासाठीं नेत्यास आपलें ध्येय व धोरण यांत








परिस्थित्यनुरूप बदल करावा लागतो, नाहींतर तो नेता अप्रिय होऊ लागून जनमत त्याला बाजूला सारतें व त्याच्या ठिकाणीं नवें नेतृत्व उदयाला येतें. नेतृत्व ही गतिशील ( dynamic ) वस्तु आहे. ठोकळे-बाजपणानें जुन्या परिस्थितींत योग्य व यशस्वी ठरलेले मार्ग व धोरण जर बदललेल्या परिस्थितींतहि अट्टाहासानें कोणी नेता तसेच चालूं ठेवूं पाहील तर त्याचा पराभव झाल्याशिवाय राहणार नाहीं. कालाच्या गतीप्रमाणें व गरजांप्रमाणें त्यानेंहि गतिमान् रहावयास हवें. सामाजिक जीवनाची ही गतिमान् प्रवृत्ति न समजणारा नेता फार काळ नेतृत्व करूंच शकत नाहीं. यशस्वी नेतृत्वासाठीं बदललेल्या परिस्थितींत लोकांच्या बदललेल्या गरजा, आकांक्षा, भावना व प्रवृत्ति यांना आदर दाखवून व त्यांच्या दिशेनेंच, नेत्यास आपलें ध्येय-धोरण ठरविलें पाहिजे. जनकल्याण हेंच त्याचें ध्येय असावें लागतें. लोकांवर केवळ सत्ता गाजविणारा नेता अयशस्वी झाल्याशिवाय राहणार नाहीं. निःस्वार्थी वृत्तीनें व सेवाभावानें लोकमतास मान देणारा व लोकांचें खरें कल्याण करूं पाहणारा नेताच दीर्घकाल नेतृत्व करूं शकतो.

### घटकांच्या जीवनाशीं समरस

आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं ज्या समूहा-( Group ) मध्यें किंवा वर्गा-( class )मध्यें व्यक्ति जन्मलेली असते व वाढलेली असते त्याचे अत्यंत प्रभावी संस्कार तिच्या मनावर झालेले असतात. त्या वर्गाच्या संस्कृतीनें, विचारांनीं व भावनांनीं तिचा पिंड बनलेला असतो. आणि म्हणून नेतृत्व करतांना सुद्धां वाटेल त्या समूहाचें किंवा वर्गाचें नेतृत्व ती व्यक्ति करूं शकत नाहीं. ज्या समाजांतील घटकांच्या जीवनाशीं त्याचें संपूर्ण जीवन समरस झालें असेल म्हणजे ज्या समाजांतील लोकांशीं त्याचीं सुखदुःखें, त्याच्या आशा-आकांक्षा, आवडीनिवडी व ध्येयें हीं एकरूप झालीं असतील त्याच समाजाचें प्रतिनिधित्व तो करूं शकतो. म्हणून खरा नेता ज्या समाजाचें व ज्या वर्गाचें नेतृत्व करतो त्याच समाजाचा किंवा वर्गाचा खऱ्या अर्थानें तो घटक असला पाहिजे. तो जर त्या समाजाच्या सुखदुःखांशीं एकरूप झाला असेल व त्यानें त्या समाजाची दुःखें व त्रुटी खऱ्या अर्थानें स्वतःहि अनुभवलीं असतील तरच त्याला त्या समाजाचीं दुःखें, इच्छा, आशा व आकांक्षा तीव्रतेनें समजूं शकतील. मगच तो खरी आंच लागून सामाजिक दुःखांचा निरास करण्यासाठीं पोटतिडीकीनें व मनापासून झगडूं शकेल. म्हणून कोणत्याहि नेतृत्वाचें यशापयश त्याच्या त्या वर्गाच्या किंवा त्या समाजाच्या सुखदुःखांशीं समरस होण्यावरच अवलंबून राहील म्हणूनच गांधीजी खऱ्या अर्थानें दरिद्री जनतेशीं एकरूप होऊन राहण्याचा प्रामाणिक व पराकाष्ठेचा प्रयत्न करीत असत.

उच्च मध्यम वर्गांत किंवा धनिक वा भांडवलदार वर्गांत जन्मलेल्या व वाढलेल्या व्यक्तीस मजूर वर्गाचें खरें प्रतिनिधित्व व नेतृत्व करतां येणार नाहीं. कारण त्याच्या मनाचा पिंड धनिक वर्गांतील विचार व भावनांनीं तयार झालेला असेल व म्हणून तो मजूरांचीं दुःखें, त्यांचा मानभंग व त्यांचें परा कोटीचें निकृष्ट जीवन यांचा खरा अनुभव नसल्यानें खऱ्या आंतरिक पोटतिडीकीनें व कमालीच्या तीव्रतेनें मजुरांच्या बरोबर शेवटपर्यंत झगडूं शकणार नाहीं. तो मुद्दाम असें करील असें नव्हे पण नकळतपणें उच्चवर्गांतील जीवनमूल्यांचा व प्रवृत्तींचा त्याच्यावर अत्यंत प्रभावी रीतीनें संस्कार झाला असल्यानें ते संस्कार त्याला अंतिम क्रांतीसाठीं जीवनमरणाचा झगडा करूं देण्यास प्रतिबंध करण्याची बरीच शक्यता असते. म्हणून मजुरांचें व शेतकऱ्यांचें किंवा इतर कोणत्याहि समाजाचें यशस्वी नेतृत्व करण्यासाठीं नेता त्याच समाजांतून उदयास आला पाहिजे. इतर समाजांतला मनुष्य सहानुभूतीनें त्यांच्याशीं कितीहि समरस होऊं शकला तरी निर्वाणीच्या वेळीं त्याचें नेतृत्व कमी पडून तें विश्वासघातकी ठरण्याची फार शक्यता असते.

त्याचप्रमाणें नेतृत्व यशस्वी होण्यासाठीं पूर्वीची समाजरचना, समाजघटना किंवा इतर धार्मिक, नैतिक, आर्थिक प्रणाली बदलून त्यांच्या ठिकाणीं नव्या इच्छित समाजरचना वा प्रणाली निर्माण करण्याचें सामर्थ्य व आत्मविश्वास हीं त्याच्याजवळ असलीं पाहिजेत. तसा विश्वास व सामर्थ्य केवळ त्याच्यांत असून भागत नाहीं तर इतरांतहि त्यानें तसा विश्वास व सामर्थ्य उत्पन्न करावयास हवें. त्याच्या ध्येयाच्या गोष्टी केवळ काल्पनिक, पोकळ, अव्यवहार्य अशा हवेंतील गप्पा होतां कामा नयेत. आपल्या ध्येयांना व उद्दिष्टांना प्रत्यक्षांत आणण्याचे मार्ग व सामर्थ्य त्याच्याजवळ असलें पाहिजे. नेता आपल्या अनुयायांपेक्षां श्रेष्ठ








असला पाहिजे. बुद्धिमत्ता, वक्तृत्व, मनुष्याची परीक्षा, समयज्ञता, प्रसंगावधान, धैर्य, शौर्य, आत्मविश्वास, संघटनाचातुर्य, लोकसंग्रहवृत्ति इत्यादि सर्व गुणांत तो आपल्या अनुयायांपेक्षां श्रेष्ठ असला पाहिजे व त्याच्या श्रेष्ठत्वामुळें तो अनुयायांच्या प्रेमास व आदरास पात्र असला पाहिजे. लोकांच्या मनांत जर त्याच्याविषयीं प्रेम, आदर व आदरयुक्त भीति किंवा दरारा नसेल तर त्याचें नेतृत्व फिकें पडून तें अपयशी होण्याची फार दाट शक्यता असते. अर्थात् त्याचा अर्थ असा नाहीं कीं नेता अरेरावी असावा. त्याच्यांत नम्रता, गोडवा व इतर सद्गुण असून श्रेय व प्रेय यांचा विवेक करण्याचें सामर्थ्य असावें व अनुयायांना श्रेयस्करच मार्ग दाखविण्याचें कार्य त्यानें करावयास हवें.

### लोकशाहींतील नेतृत्व

नेत्याजवळ अत्यंत प्रभावी अशी स्वतंत्र इच्छाशक्ति व निर्णयशक्ति असावी लागते. परिस्थितीचें सम्यक् निरीक्षण करून आपल्याला काय करावयाचें त्याचा निर्णय योग्य रीतीनें व स्वतंत्रपणें घेण्याची कुवत त्याच्या ठिकाणीं असली पाहिजे. अर्थात् त्या बाबतींत तो आपल्या इतर सहकाऱ्यांशीं व अनुयायांशीं विचार-विनिमय करूं शकतो व त्यांचीं मतेंहि जमेस धरून व साधकबाधक विचार करूनच मग अंतिम निर्णयावर येऊं शकतो. परंतु जेवढ्या प्रमाणांत तो लोकमतास अधिक मान देत असेल तेवढ्या प्रमाणांत त्याचें वैयक्तिक स्वातंत्र्य कमी होत जातें व लोकांच्या आशा-आकांक्षा व मतें यांना अनुसरूनच त्याला स्वतःसहि विचार करून मगच निर्णय घ्यावा लागतो. हें लोकशाही राजवटींत अधिकांशानें घडतें. लोकशाहींतील नेतृत्व लोकमतानें मर्यादित होत असतें. तें संपूर्णतया स्वतंत्र व निरपेक्ष असूं शकत नाहीं. कारण लोकशाहींत लोकमतास सार्वभौमत्व असतें व लोकमत नेत्यावर बंधनकारक असतें. लोकशाहींत नेता जर लोकमतास आदर न दाखवून लोकांच्या मतानुसार आपल्या धोरणांत व मार्गांत बदल करूं लागला तर त्याचें नेतृत्व अल्पावधींत अप्रिय होऊन तें झुगारलें जाईल. आदर्श लोकशाहींत यंत्रणाच अशी असते कीं तिच्यांत आक्रमक वृत्तीचा, उद्दाम, अरेरावी व लोकमतास न मानणारा नेता वसूंच शकत नाहीं. तें हुकुमशाहींतच शक्य होतें. लोकशाहींतील नेता लष्करी सामर्थ्याच्या जोरावर आपलें नेतृत्व करीत नसतो तर त्याचें नेतृत्व लोकांचीं मनें बुद्धिवादी रीतीनें वळविण्यावर व लोक-प्रेमावर आधारलेलें असतें. नेता आपल्या नेतृत्वासाठीं लोकांच्या भावनाशीलतेचा आधार घेत असतो व लोकांच्या भावनांना अनुकरण ( Imitation ), सूचन ( Suggestion ) व सहानुभूति ( Sympathy ) या मार्गांनीं वळण लावून त्या आपणांस अनुकूल करून घेत असतो. त्यांतल्या त्यांत नेता निःस्वार्थी, निरलस व निष्काम सेवावृत्तीनें व लोक-कल्याणाच्या भावनेनें प्रेरित होऊन कार्य करीत असल्यास त्याच्यावर लोकांचा अधिक विश्वास राहतो व तो अधिक काळपर्यंत टिकतो. उलट वशिलेबाजी, पक्षपात, अप्रामाणिकता, स्वार्थ व दंभ यांचा अंगीकार करून जो नेता लोकांना वंचित करून नेतृत्वांतून आपला स्वार्थ साधीत असतो त्याच्यावरून लोकांचा विश्वास अल्पावधींत उडाल्याशिवाय राहात नाहीं व त्याचें नेतृत्व दीर्घकाल टिकूं शकत नाहीं.

नेत्यास जसा मान व कीर्ति मिळते तशीच त्याच्यावर जबाबदारीहि फार मोठी असते. अनुयायांना किंवा जनतेला त्यानें दिलेलीं वचनें व आश्वासनें जर त्याला पूर्ण करतां आलीं नाहींत व त्यांना उद्दिष्ट साध्य करून देतां आलें नाहीं तर त्याच्यावरील जनतेचा विश्वास झपाट्यानें उडतो व लोकांत तो अप्रिय होऊं लागतो. एवढेंच नव्हे तर जर तो स्वखुषीनें बाजूस झाला नाहीं तर जनता त्याला बाजूस सारते, त्याचें नेतृत्व झुगारून देते व वेळ पडल्यास त्याचा जीवहि धोक्यांत आणते. अयशस्वी नेत्याचा जनता छळ करूं लागते. त्याचप्रमाणें नेता हा जनतेचा किंवा अनुयायांचा आदर्श पुरुष असतो. अनुयायी नकळतपणें नेत्याचें अनुकरण करीत असतात. नेता चांगला, सत्यवचनी, प्रामाणिक, सद्वर्तनी व विश्वासू असला तर अनुयायीहि त्याच्या-सारखे सद्वर्तनी होण्याची बरीच शक्यता असते. उलट, नेता जर अरेरावी, स्वार्थी, बदफैली, उन्मत्त, दुराचरणी, अप्रामाणिक व अविश्वासार्ह असेल तर अनुयायांतहि तशा वृत्ती वाढण्याची भीति असते; नाहींतर उलट, प्रतिक्रिया होऊन त्याच्याविषयीं अनुयायांत द्वेषवृत्ति फैलावते व त्याचें नेतृत्व धिक्कारलें जातें. म्हणून नेता जर चांगला, आदर्श व सद्वर्तनी असला तर त्यामुळें जनतेचें चारित्र्य सुधारण्यास बरीच मदत होऊं शकते.










सहकारी सुवर्णमहोत्सवाच्या निमित्तानें : प्रा. गोवर्धन पारीख

# सहकारी चळवळीचें स्वरूप, उद्दिष्ट व वैचारिक अधिष्ठान

आर्थिक दृष्टीनें मागासलेले समजल्या जाणाऱ्या देशांमध्यें सहकारी चळवळ सुरूं होण्याचा पहिला मान भारताकडे येतो. या चळवळीस यंदा पन्नास वर्षें पुरीं झाल्यामुळें देशांत सर्वत्र तिचा सुर्वणमहोत्सव साजरा होत आहे. गेल्या पन्नास वर्षांत हजारों कार्यकर्त्यांच्या परिश्रमामुळें या चळवळीस बरेंच मोठें स्वरूप व महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. याबद्दल चळवळींतील कार्यकर्त्यांना आणि इतरांना देखील सार्थ अभिमान व आनंद वाटणें स्वाभाविक आहे. सुवर्णमहोत्सवाच्या निमित्तानें सर्वत्र या भावना व्यक्त होत आहेत. तथापि त्याबरोबरच चळवळीचा आजवरचा इतिहास, तिचें स्वरूप व तिच्या मुळाशीं असलेलें वैचारिक अधिष्ठान यासंबंधीं विचार होणें अत्यंत आवश्यक आहे. अशा प्रकारच्या समीक्षेवांचून चळवळीचें भविष्य उज्ज्वल होऊं शकणार नाहीं.

देशांतील आजच्या परिस्थितींत तर वर उल्लेखिलेल्या समीक्षेची गरज कितीतरी अधिक आहे असें म्हणतां येईल. आर्थिक मागासलेपणांतून उद्भवणाऱ्या दारिद्र्याच्या दुष्टचक्रांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न आज सुरूं आहे. मागासलेपणामुळें विविध अडचणींबरोबरच विशिष्ट संधी देखील प्राप्त होत असतात. आर्थिक विकास ही केवळ कालांतरानें आपोआप घडून येणारी बाब नव्हे हें एकदां मान्य केलें म्हणजे तद्विषयक हेतुपुरस्सर कृति आणि तिचें वैचारिक अधिष्ठान यांची गरज अपरिहार्यपणें निर्माण होते. आणि ती पुरी करण्याच्या प्रयत्नांत इतरत्र झालेल्या चुका टाळण्याची संधि प्राप्त होते. मागासलेल्या राष्ट्रांना इतरत्र शंभर-दोनशें वर्षांत झालेली प्रगति कितीतरी अल्प काळांत घडवून आणणें शक्य आहे. परंतु ती घडवून आणीत असतांना इतरांनीं केलेल्या चुका व त्यांतून निर्माण झालेले दोष हेहि टाळणें आवश्यक आहे. दोन्ही बाबतींत दुसऱ्यांपासून योग्य तो बोध घेण्याची आज गरज आहे.

भारतीय सहकारी चळवळीचा आरंभ परकीय राजवटींत, अत्यंत मागासलेल्या आर्थिक परिस्थितींत झाला. आणि तो देखील सरकारी कायद्यामुळें ! या घटनेचे परिणाम चळवळींत प्रतिबिंबित होणें स्वाभाविक होतें. या परिणामांचा प्रथम थोडक्यांत विचार करणें युक्त होईल. या परिणामांचें थोडक्यांत वर्णन करावयाचें झाल्यास वरील परिस्थितींत चळवळ वा आंदोलन न होतांच संघटना जन्मास आल्या असें म्हणतां येईल. एकादी सहकारी पतपेढी, दुकान किंवा तत्सम संस्था ही एक प्रकारची प्रत्यक्ष संघटना होय. ती निर्माण करतांना निर्मात्यांच्या आर्थिक व्यवहारविषयक दृष्टिकोणांत मूलभूत बदल होणें आवश्यक आहे. हा बदल घडवून आणणें हें चळवळीचें कार्य होय. त्यांतून निर्माण होणारी सहकारी संघटना ही चळवळीच्या यशस्वितेचें एक महत्त्वाचें गमक म्हणतां येईल. आर्थिक जीवनासंबंधीं दृष्टिकोण बदलला म्हणजे नव्या दृष्टिकोणांतून योग्य स्वरूपाच्या संघटनांची उभारणी करण्याची इच्छा निर्माण होणें स्वाभाविक आहे. संघटना किंवा संस्था ही या इच्छेचेंच मूर्त स्वरूप होय. त्याचप्रमाणें अशा रीतीनें अस्तित्वांत आलेली संस्था ही चळवळीचें एक महत्त्वाचें केंद्र म्हणूनहि समजतां येईल. चळवळीचें स्वरूप तिच्यामुळें अधिक खोल व व्यापक होऊं लागेल. सहकारी चळवळ ही स्वेच्छाजन्य चळवळ असल्यामुळें वैचारिक आंदोलन आणि संस्थात्मक संघटन यांचा वर उल्लेख केलेला संबंध तिच्या स्वरूपांतच अभिप्रेत आहे. दोन्हींची सांगड घातली जाणें सहकारी प्रयत्नांच्या यशस्वितेच्या दृष्टीनें आवश्यक आहे.

भारतीय सहकारी चळवळींत आरंभापासून हें स्वरूप आढळत नाहीं. सोसायट्या, संस्था आढळतात परंतु आंदोलन फारसें नाहीं. यामुळें सहकारी चळवळ मुळांतच वैचारिक दृष्ट्या दुबळी राहिली आहे आणि या दुबळेपणाचे परिणाम सहकारी संस्थांच्या कारभारावर












झालें असून अजूनहि ते दृष्टोत्पत्तीस येत आहेत. आरंभीं हा दुबळेपणा अपरिहार्य होता असें कदाचित् म्हणतां येईल. आर्थिक प्रश्न सहकार्याधिष्ठित स्वप्रयत्नांनीं सोडविण्याविषयींचा विश्वास ही या चळवळीची महत्त्वाची प्रेरणा आहे. परकीय राजवटींत ही प्रेरणा निर्माण होणें किंवा वाढीस लागणें अशक्य होतें. कोणताहि रचनात्मक आर्थिक प्रयत्न अनुकूल राजकीय वातावरणावांचून यशस्वी होणें अशक्य आहे हीच तत्कालीन समजूत होती. आणि यामुळें आत्मविश्वाससंपन्न कार्यकर्ते राजकीय आंदोलनाकडे आकर्षित होत; विधायक, रचनात्मक कार्यक्षेत्रांत त्यांचा बऱ्हंशीं अभावच होता. आर्थिक व्यवहार जेव्हां अधिकाधिक अनाकलनीय बनत जातो, आर्थिक शक्तीचें स्वरूप व परिणाम न समजल्यामुळें त्यांना काबूंत आणण्याऐवजीं त्यांना शरण जाणें एवढाच मार्ग शिल्लक रहातो अशा परिस्थितींत होणारी एक विधायक विरोधाची प्रतिक्रिया म्हणजे सहकारी चळवळ ही होय. तथापि ही चळवळ भारतांत सुरू होण्याच्या काळांत आर्थिक आपत्तींचें मूळ ' राजकीय ' स्वरूपाचें मानलें गेल्यामुळें या प्रतिक्रियेला फारसा वाव नव्हता. कारण आर्थिक व्यवहार गुंतागुंतीचा व अनाकलनीय झालेला नव्हता; तो परकीय सत्तेद्वारां नियंत्रित केला गेला होता.

देशांत भांडवलशाही त्या काळांत फारशी अस्तित्वांत नव्हती. त्यामुळें तिच्यांतून निर्माण होणाऱ्या विशिष्ट प्रकारच्या आर्थिक शोषणाचाहि विशेष अनुभव नव्हता. अशा परिस्थितींत " नफ्यासाठीं उत्पादन " या तत्त्वावर संघटित केल्या जाणाऱ्या आर्थिक प्रयत्नांच्या परिणामांची जाणीव व त्यांतून जन्मणारी विरोधी चळवळ उद्भवणें वा वाढीस लागणें अशक्य होतें. भांडवलशाही विरोधाऐवजीं ' देशी ' भांडवलशाहीबद्दल सहानुभूति असलेलाच तो काळ होता. यामुळें सहकारी चळवळ म्हणजे भिन्न तत्त्वांच्या आधारावर आर्थिक जीवन संघटित करण्याचा प्रयत्न होय, ही कल्पना प्रामुख्यानें पुढें येणें अशक्य होतें. सहकारी चळवळ ही भांडवलशाहीविरोधी किंवा वस्तूंच्या क्रयविक्रयांतील मध्यस्थाचें स्थान नाहींसें करूं पहाणारी चळवळ बनण्याऐवजीं, सरंजामशाहीचा एक घटक मानतां येईल अशा सावकारीचाच केवळ विरोध करीत राहिली. आणि पन्नास वर्षांच्या काळांतील प्रगतीनंतर देखील पतपेढ्या हाच सहकारी संस्थांचा आजचा सर्वांत महत्त्वाचा घटक आहे असें म्हणतां येईल. मागासलेल्या परिस्थितींत जन्मलेल्या या चळवळीला अशा प्रकारें बराच काळपर्यंत भांडवलशाहीस विरोध करण्याचें नव्हें तर भांडवलशाहीस पूरक असेंच कार्य करावें लागलें आहे. अडलेल्या परिस्थितींतील जाचक स्वरूपाच्या कर्जांतून शेतकऱ्याची मुक्तता करून त्याच्या क्रयशक्तींत थोडीफार सुधारणा करणें हाच सहकारी चळवळीचा बराच काळपर्यंत मुख्य कार्यक्रम राहिला. आणि तिला मर्यादित स्वरूपाच्या भूतदयेनें प्रेरित झालेल्या आर्थिक उपक्रमाच्या दृष्टीनेंच पहाण्यांत येऊं लागलें. कालपरत्वें चळवळीनें विविध क्षेत्रांत प्रवेश केला आहे हें खरें ! तथापि त्यामुळें चळवळीच्या मूळच्या वैचारिक मर्यादा कितपत नाहींशा झाल्या हा एक प्रश्नच आहे. त्या बऱ्हंशानें कायम आहेत असेंच म्हणावें लागेल.

या वैचारिक मर्यादांचा चळवळींतील निरनिराळ्या संस्थांवर परिणाम होणें स्वाभाविक होतें. यासंबंधींची कांहीं गमकें सूचित करतां येण्यासारखीं आहेत. स्थापन झाल्यानंतर शिथिल होणाऱ्या किंवा बंद पडणाऱ्या संस्थांचें प्रमाण पुष्कळच मोठें आहे. चालूं असलेल्या संस्थांत प्रत्यक्ष कारभाराविषयीं जागरूक असणाऱ्या सभासदांचें प्रमाणहि अत्यंत तुटपुंजें आढळतें. बहुसंख्य सभासदांची ' डिव्हिडंड ' वर केंद्रित झालेली दृष्टि, मूठभर कार्यकर्त्यांत निर्माण होणारें संस्था ' ताब्यांत ' घेण्याचें व ठेवण्याचें ' राजकारण ' आणि अफरातफर, वशिलेबाजी इत्यादि दोष यांबद्दल बहुसंख्य सभासदांची संस्थांच्या कारभाराविषयींची उदासीनता हीच जबाबदार म्हटली पाहिजे. या वैचारिक मर्यादांमुळेंच सहकारी संस्थांचा सभोंवतालच्या वातावरणावरहि विशेष परिणाम होत असल्याचें दिसत नाहीं. सहकारी चळवळीचीं केंद्रस्थानें बनण्याऐवजीं सहकारी संस्था या इतर अनेक संस्थांपैकींच समजल्या जातात.

मागासलेल्या परिस्थितीच्या परिणामांचा आणखी एका वेगळ्या दृष्टीनें विचार करतां येईल. शेतकरी, कारागीर वा अन्य सामान्य माणूस यांच्या अडाणीपणामुळें सहकारी संस्था काढून त्या व्यवस्थितपणें चालविण्याइतकी कुवत कोणाच्याहि ठिकाणीं नव्हती.










यामुळें सहकारी संस्थांची सरकारी देखरेखीखालींच वाढ झाली. शासनयंत्राला या चळवळींत अत्यंत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें. अजूनहि ही परिस्थिति कायम आहे. यामुळें स्वेच्छाजन्य विधायक चळवळीऐवजीं सहकारी चळवळ ही एक राज्यमान्य आणि सत्ताधीशांनीं पुरस्कारलेली चळवळ बनली आहे. राज्यकर्त्यांचें चळवळीसंबंधीचें धोरण आणि विरोधकांची तिच्याबाबतची दृष्टि या दोहोंतहि या परिस्थितीमुळें विकृति निर्माण होत आहे. परकीय राजवटींत शासनयंत्राच्या या स्थानामुळें, ध्येयनिष्ठ कार्यकर्ते चळवळीकडे आकर्षित होण्याऐवजीं बडेबडे जमीनदार, सुखवस्तू शेतकरी, नामांकित वकील, सावकार इत्यादि प्रतिष्ठित वर्ग ( elite ) चळवळीचें मार्गदर्शन करीत होता. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर त्यांची जागा नवा प्रतिष्ठित वर्ग घेत असल्याचें दिसत आहे. तथापि शासनसत्तेचें वर्चस्व अजून कायम असल्यामुळें वरील बदलाच्या योगानें चळवळींत जिवंतपणा निर्माण झाल्याचें दिसून येत नाहीं. उलट, सत्ताधीशाची सत्ता कायम राखण्याच्या साधनांपैकीं एक साधन हाच या चळवळीविषयीं सामान्य दृष्टिकोण आढळतो.

सुवर्णमहोत्सवाच्या निमित्तानें, सहकारी चळवळीचा आजवरचा विकास, त्यांतून आलेले अनुभव आणि चळवळीच्या आजच्या गरजा यांसंबंधीं ऊहापोह होत आहे. तथापि हा बहुतांशानें तांत्रिक व व्यावहारिक प्रश्नांपुरताच मर्यादित आहे. या प्रश्नांना महत्त्व नाहीं. सहकारी संस्थांचा कारभार तांत्रिक दृष्टया निर्दोष असणें आणि व्यावहारिक अर्थानें यशस्वी होणें अत्यंत महत्त्वाचें आहे. तसें न झाल्यास चळवळीवरील विश्वासाला धक्का पोहोंचतो हेंहि खरें आहे. शिवाय सहकारी संस्थांचा व्यवहार आर्थिक कार्यक्षमतेच्या कसोटीस उतरणें आवश्यक आहेच. सहकारी मार्गांत साधनसामग्रीचा योग्य उपयोग केला जातो, अपव्यय होत नाहीं हें स्पष्ट होणें अत्यावश्यक आहे. तथापि केवल तांत्रिक व व्यावहारिक बाबींवरच सारें लक्ष केंद्रित झाल्यानें चळवळीचें भविष्य सुधारूं शकणार नाहीं. किंबहुना शासनयंत्राचें नियंत्रण, कायद्याचा कांटेकोर अंमल आणि व्यवहारविषयक मर्यादित अंमल यांच्या योगानेंच सहकारी संस्थांचा चालू व्यवहार आहे त्यापेक्षां अधिक सुधारूं शकेल अशी अपेक्षां देखील फारशी बाळगतां येणार नाहीं. याकरितां सुवर्णमहोत्सवाच्या निमित्तानें होत असलेल्या चर्चेत चळवळीच्या वैचारिक भूमिकेविषयीं ऊहापोह होणें अत्यंत आवश्यक आहे.

सहकारी चळवळीचें स्वरूप व उद्दिष्टें कोणतीं हा प्रश्न जगांतील अनेक राष्ट्रांमधील सहकारी चळवळींपुढें आज निर्माण झाला आहे. भांडवलशाहींतील दोषांची तीव्रता कमी करणारी, मक्तेबाजी आणि तिच्यांतून उद्भवणाऱ्या समाजहितविरोधी व्यवहाराला आळा घालणारी समाजवादाला पूरक स्वरूपाची ही चळवळ आहे ही कल्पना अनेकांना अपुरी वाटूं लागली आहे. आजवर सहकारी कार्यकर्ते "गरिबांच्या हिताचें कार्य" या दृष्टीनेंच आपल्या कामाकडे पाहात आले आहेत. यामुळें भांडवलशाही विरुद्ध समाजवाद या आर्थिक क्षेत्रांतील वैचारिक कलहामध्यें सहकारी आंदोलनाला फारसें महत्त्व नाहीं हीच समजूत दृढ झाली आहे. शेती व तदनुषंगिक व्यवहार, क्रयविक्रय, लहानसहान उद्योगधंदे, परराष्ट्रीय व्यापार, बँका, विमाव्यवसाय, बांधकाम, वहातुक इत्यादि विविध क्षेत्रांत कमीजास्त प्रमाणांत परंतु यशस्वीपणें चळवळीनें प्रवेश केला असतांना देखील चळवळीसंबंधींची वरील समजूत कायम राहिली आहे. यामुळें आर्थिक प्रश्न सोडवण्यासाठीं पुढें मांडल्या जाणाऱ्या मूलभूत दृष्टिकोणांमध्यें सहकार्याचा अंतर्भाव होत नाहीं. सहकारी कार्यकर्ते एक प्रकारच्या न्यूनगंडानें ग्रासले जातात. आणि अंगीकृत कार्यावरील निष्ठा वाढीस लागण्याऐवजीं कलहप्रवृत्त आर्थिक दृष्टिकोणांपैकीं हा वा तो दृष्टिकोण स्वीकारण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते. अशा परिस्थितींत चळवळीच्या वास्तव स्वरूपाविषयींचा प्रश्न निर्माण होणें स्वाभाविक होय.

सहकार्य हें कलहापेक्षां अधिक मूलभूत स्वरूपाचें तत्त्व होय. 'सामाजिक' जीवन या कल्पनेंतच तें अंतर्भूत झालेलें आहे. सामाजिक जीवन कलहापासून मुक्त अशा स्वरूपाचें संभवतें; सहकार्यावांचून तें अशक्य आहे. या दृष्टीनें पाहिल्यास खुल्या स्पर्धेवर आधारलेली भांडवलशाही अथवा राज्यद्वारां आर्थिक जीवन नियंत्रित करूं पहाणारा समाजवाद हें सहकार्याच्या अधिराज्यांतीलच पर्याय होत. स्पर्धेवर अधिष्ठित झालेल्या आर्थिक व्यवहारांत अ-








प्रत्यक्षपणें सहकार्य हें गृहीत तत्त्व म्हणून जमेस धरावेंच लागतें. आणि त्यामुळें पूर्णतया खुल्या म्हटल्या जाणाऱ्या स्पर्धेंत देखील या गृहीत तत्त्वांतून निघणाऱ्या विशिष्ट मर्यादा पाळाव्याच लागतात. समाजवादी अर्थव्यवहारांतील सहकार्याची कल्पना हीहि स्पष्टच आहे. यामुळें सहकार्यविरोधी वा त्यापासून भिन्न स्वरूपाचे आर्थिक संघटनेचे– हे मार्ग नसून ते सहकार्याचेच दोन विशिष्ट पर्याय आहेत असें म्हणणें अधिक युक्त होईल.

तथापि हे दोन्ही पर्याय सदोष आहेत. भांडवलशाहींत व्यक्तीव्यक्तींच्या स्पर्धेंतूनच सामाजिक हित अधिकाधिक साधलें जाईल, कलहांतूनच संवादी समाजव्यवस्था वाढत्या प्रमाणांत निर्माण होईल ही कल्पना केंद्रस्थानीं आहे. स्पर्धेचें समाजव्यवस्थेंतील स्थान किंवा महत्त्व या संबंधीचा हा प्रश्न नसून सामाजिक संघटनेचें मूलतत्त्व म्हणून स्पर्धेस दिली जाणारी मान्यता येथें अभिप्रेत आहे. आणि ही मान्यता उदारमतवादाच्या सदोष तात्त्विक भूमिकेंतून जन्मली आहे. व्यक्तीव्यक्तींच्या हितसंबंधांत मेळ घालण्याचा प्रश्न सोडवतांना या विचारसरणीनें "संवादित्व" हा विधिनियम मानला आणि बुद्धिशील व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करीत या विधिनियमाला पोषक स्वरूपाचे वर्तननियम बुद्धीच्या साहाय्यानें शोधण्याचें व त्याप्रमाणें वागण्याचें आवाहन केलें. यामुळें स्वतंत्र होत असलेली बुद्धि पुनः जखडली गेली आणि व्यक्तिस्वातंत्र्याला मर्यादा निर्माण झाल्या. उदारमतवादाच्या तात्त्विक समीक्षेंत येथें विस्तारानें जातां येणार नाहीं. आर्थिक व्यवहारापुरताच विचार करावयाचा म्हणजे स्वहितानें प्रेरित झालेला स्वतंत्र प्रयत्न इतरांशीं स्पर्धेच्या स्वरूपांतच कां व्यक्त झाला पाहिजे हा खरा प्रश्न आहे. स्पर्धेंतून सामाजिक कल्याण उद्भवेल ह्या श्रद्धेवांचून याला उत्तर सांपडणें कठिण आहे. या उत्तराच्या मर्यादा या मार्गाच्या पुरस्कर्त्यांनीं देखील मान्य केल्या आहेत. उलट, या श्रद्धेमुळें मानवी बुद्धीवर बंधनें लादलीं जातात. आणि इतरांशीं जाणीवयुक्त सहकार्य करून स्वहित साधण्याच्या सामाजिक दृष्टीनें अधिक उन्नत असलेल्या मार्गाचा त्याग केला जातो. म्हणून व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे स्पर्धेचें स्वातंत्र्य ही कल्पना सोडणें आवश्यक आहे. तिच्या मुळाशीं बुद्धिशील माणूस हें प्रमेय नसून 'अर्थप्रवण मानव' हें तत्त्व आहे. मानवी स्वातंत्र्याचा पुरस्कार करतांना मानवासंबंधींची ही एकांगी व तर्कदुष्ट कल्पना टाकून देणें आवश्यक आहे.

संवादित्वाच्या अपरिहार्यतेचा फोलपणा भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या प्रत्यक्ष अनुभवानें स्पष्ट झाला. यामुळें स्वहितप्रेरित प्रयत्न आणि त्यांतून निर्माण होणारी स्वर्धा ही समाजहिताला विरोधीच असली पाहिजे असा आत्यंतिक स्वरूपाचा निष्कर्ष काढण्यांत आला. या निष्कर्षाचा परिणाम म्हणजे स्वहित साधण्याच्या प्रयत्नांचा आधार असलेल्या खाजगी मालकीवरील प्रहार हा होय. समाजवादी विचारसरणीचें हें मौलिक व किमान अधिष्ठान आहे. स्पर्धेंतून आपोआप अप्रत्यक्षपणें सामाजिक कल्याण साधत नाहीं म्हणून त्याचें स्वरूप स्पष्टपणें ठरवून तें साधण्याच्या नियोजित सामाजिक प्रयत्नांत वैयक्तिक आर्थिक व्यवहार बसवला पाहिजे ही कल्पना पुढें आली. राज्याला आर्थिक व्यवहारांत मध्यवर्ती स्थान मिळालें. व्यक्तिस्वातंत्र्याला मुरड घातली गेली. आणि सहकार्य हें बुद्धिशील व्यक्तींच्या स्वेच्छाजन्य प्रयत्नांतून निर्माण होण्याऐवजीं सत्ताधीशांकरवीं लादण्यांत येऊं लागलें. याहि दृष्टिकोणांतील मूलतत्त्व 'अर्थप्रवण मानव' हेंच आहे हें ध्यानांत घेतलें पाहिजे. यामुळें एका अर्थानें भांडवलशाही व साम्यवाद हीं जुळीं भावंडेंच बनतात. एकांतील संवादित्वाच्या श्रद्धेंतून जन्मणारें अहेतुक सहकार्य हें आर्थिक व्यवहारांत विषमता, बेकारी, असुरक्षितता, गोंधळ निर्माण करते. दुसऱ्यांत सामाजिक कल्याण राज्यसत्तेनें साधलें पाहिजे या कल्पनेंतून लादलें जाणारें सहकार्य व्यक्तिस्वातंत्र्याचा नाश करतें व सामाजिक आणि सांस्कृतिक जीवन अधोगतीस नेतें. एकांतील सहकार्यांत मनुष्याची बुद्धिशीलता आणि हेतुपुरस्सर सहकार्य यांना स्थान नाहीं. दुसऱ्यांत सहकार्यासाठीं स्वातंत्र्याची व स्वेच्छाजन्य प्रयत्नांची जरूरी मान्य नाहीं। म्हणजेच मनुष्याची बुद्धिशीलता देखील नाकारण्यांत येते. या दृष्टीनें हे दोन्ही पर्याय मनुष्यासंबंधींच्या विकृत निदानावर आधारलेले आहेत. त्यांच्यांतील विरोध कितपत मूलगामी आहे हा एक प्रश्नच आहे.

सहकार्याच्या वरील दोन्ही कल्पनांपेक्षां स्वेच्छाजन्य, जाणीवयुक्त सहकार्याचा विचार अधिक योग्य व







उन्नत म्हटला पाहिजे. आणि हाच विचार सहकारी चळवळीच्या मुळाशीं आहे. स्वहित आणि व्यक्ति-स्वातंत्र्य या दोन्ही कल्पनांना मान देऊन व्यक्ती-व्यक्तींच्या हितसंबंधांत विवेकशीलतेच्या आधारानें मेळ घालणारी ही चळवळ आहे आर्थिक व्यवहारां-विषयीं तिच्यांत अभिप्रेत असलेला दृष्टिकोण आर्थिक असुरक्षितता व 'लष्करीकरण' हे दोन्ही दोष टाळण्यास समर्थ आहे. तिच्या स्वेच्छाजन्य स्वरूपामुळें सत्तेचें केंद्रीकरण टाळूं पहाणाऱ्या लोकशाही राजकीय दृष्टि-कोणास पोषक असें तिचें स्वरूप आहे. सामान्य माण-साचा आर्थिक व्यवहारासंबंधींचा दृष्टिकोण आणि आर्थिक जीवनाचें संस्थात्मक स्वरूप या दोहोंतील बदल तिच्यांत अभिप्रेत असल्यामुळें नव्या व स्वतंत्र समाजव्यवस्थेची निर्मिति करण्याचें सामर्थ्य या चळ-वळींत आहे. आर्थिक दृष्टीनें सहकारी संस्थांची कार्यक्षमताहि अनेक देशांतील सहकारी चळवळीच्या प्रत्यक्ष अनुभवानें स्पष्ट झालेली आहे. यामुळें सहकारी आंदोलन हा आर्थिक जीवन, नव्या आणि आजवरच्या अन्य मार्गांपेक्षां अधिक योग्य व श्रेष्ठ मार्गानें संघटित करण्याचा स्वतंत्र प्रयत्न होय असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण आर्थिक जीवनांतील गोंधळ आणि तें संघटित करण्याच्या अन्य पद्धतीमुळें होणारें सत्तेचें केंद्रीकरण हीं दोन्हीहि त्यांत टाळतां येतात.

सहकारी दृष्टिकोणाचें हें वैशिष्ट्यपूर्ण महत्त्व अनेक जण मान्य करतात. तथापि 'सगळा' आर्थिक व्यव-हार या तत्त्वावर आधारला जाणें कितपत शक्य आहे, याविषयीं अनेकदां शंका घेतली जाते. या शंकेची तीन महत्त्वाच्या प्रश्नांच्या रूपानें मांडणी करतां येणें शक्य आहे. अर्थात् या प्रश्नांचें विवेचन केल्यानें प्रस्तुत विषय पूर्णपणें हाताळला जातो असें समजण्याचें कारण नाहीं. त्याबद्दल कांहीं शंका शिल्लक रहाणें शक्य आहे. तथापि मूलगामी विवेचन यामुळें बरेंच आटो-क्यांत येण्यासारखें असल्यामुळें या प्रश्नांचा थोडक्यांत ऊहापोह करणें युक्त वाटतें. यांतील पहिला प्रश्न असा कीं सर्व आर्थिक व्यवहार सहकारी तत्त्वावर अधिष्ठित करावयाचा म्हणजे सहकारी अर्थव्यवस्थेचें स्वरूप स्पष्ट होणें जरूर आहे. तें स्पष्ट होई तोंपर्यंत प्रस्तुत मार्गाबद्दल पुरेसा विश्वास उत्पन्न होणें कठिण आहे. दुसरा प्रश्न म्हणजे आधुनिक उत्पादनतंत्राचा उपयोग अशा अर्थव्यवस्थेंत करतां येणें कितपत शक्य आहे ? तें शक्य नसल्यास तंत्रविषयक कोणता दृष्टिकोण स्वीकारा-वयाचा ? त्याचप्रमाणें तांत्रिक साधनांचा सहकारी संस्थाद्वारा उपयोग होणें शक्य नसल्यास त्या उपयोगा-साठीं भिन्न मार्गाचा अवलंब करावयाचा काय ? व तो कोणत्या पद्धतीनें ? आणि तिसरा प्रश्न म्हणजे आर्थिक व्यवहाराची ही नवी मांडणी आजच्या परिस्थितींत विरोधावांचून करतां येईल काय ? विरोध होणें अपरि-हार्य असल्यास त्याशीं सामना करण्याची तयारी करणें योग्य नव्हे काय ? — सहकारी दृष्टिकोणाची इष्टता मान्य करून देखील त्याच्या व्यवहार्यतेविषयीं वरील शंका घेतल्या जाणें शक्य आहे. या प्रश्नांचा विस्तारानें विचार करणें येथें शक्य नसलें तरी त्याबद्दल स्थूल विवेचन करणें जरूर आहे.

वरील तीन प्रश्नांपैकीं पहिला प्रश्न बऱ्याच अंशीं अस्थानीं आहे असें वाटतें. आर्थिक व्यवहाराविषयीं नवा दृष्टिकोण पुढें मांडणारांनीं अर्थव्यवस्थेची रूपरेषा दाख-वलीच पाहिजे हें म्हणणें योग्य नाहीं. अन्य आर्थिक दृष्टिकोणांना देखील हें विधान लागू पडतें. उत्पादन-साधनांवरील सामाजिक मालकी आणि गरजा भागविण्या-च्या हेतूनें उत्पादन या सामान्य तत्त्वांपलीकडे मार्क्सच्या लेखनांत समाजवादी अर्थव्यवस्थेविषयीं एक अक्षर देखील सांपडत नाहीं हें प्रसिद्ध आहे. आणि रशियां-तील आजचा आर्थिक व्यवहार हा समाजवादी म्हणावयाचा किंवा नाहीं, तो कांहीं विशिष्ट पूर्व-तत्त्वांवर आधारलेला आहे कीं प्रत्यक्ष परिस्थिति व अनुभव त्यांतून निर्णीत झालेला आहे हे अजूनहि वादग्रस्त प्रश्न आहेत. राजकीय सत्तेच्या आधारानें अर्थव्यवस्था तांतडीनें बदलूं पहाणाऱ्या साम्यवादाचें हें स्वरूप आहे, हें ध्यानांत घेतलें म्हणजे नव्या अर्थव्यवस्थेच्या पेशींच्या स्वरूपांत सहकारी संस्थांची हळुहळू उभारणी करून आर्थिक व्यवहाराचें स्वरूप बदलूं पहाणाऱ्या विचारसरणीबाबत त्या व्यवहाराची रूपरेषा तयार करण्याच्या कल्पनेचें वैयर्थ्य सहज ध्यानांत येईल. अशा रूपरेषेला महत्त्व नाहीं. नवी सहकारी अर्थव्यवस्था पूर्वनिर्णीत रूपरेषेच्या चौकटींत बसविण्याच्या हेतूनें उभारली जाणें शक्य व योग्य नाहीं. उलट सहकारी संघटनांच्या वाढीबरोबरच आर्थिक व्यवहारांतील विविध प्रश्न कोणत्या प्रकारें








सोडवणें इष्ट होईल याबद्दल संशोधन होणें जरूर आहे.

आधुनिक तंत्राचा उपयोग सहकारी संघटना कितपत करूं शकतील हा प्रश्न मात्र महत्त्वाचा म्हटला पाहिजे. सहकारी संघटनांची आर्थिक कार्यक्षमता सिद्ध झाली आहे हें खरें. पण ती बहुधा लहानलहान उद्योगधंद्यां-बाबत ! मोठमोठे मुद्देमाल तयार करण्याचे कारखाने, रेल्वे, जहाजें इत्यादि वहातुकीचीं साधनें, विद्युत्पादन वगैरे सारख्या क्षेत्रांत सहकारी संस्था कितपत योग्य ठरतील हा एक प्रश्नच आहे. आणि सत्तेचें केंद्रीकरण होण्यास मुख्यत्वेंकरून हीं क्षेत्रें जबाबदार आहेत, असा या आक्षेपाचा अर्थ आहे. या आक्षेपाचें महत्त्व नाकारतां येत नाहीं. हजारों कारखान्यांना एकाच ठिका-णाहून विद्युत्पुरवठा होणें, एकाच कारखान्यांतील लोखंड वा पोलाद उपयोगांत आणावें लागणें किंवा एकाच प्रकारच्या वहातुकीच्या साधनांवर अवलंबून असावें लागणें यांत आजच्या केंद्रीकरणाचें मूळ बऱ्याच अंशानें सांपडूं शकतें. आणि तें टाळण्यासाठीं शक्ति, उत्पादन व वहातुक यांचीं हीं साधनें सहकारी अर्थव्यवस्थेनें उपयोगांत आणण्याची गरज नाहीं असें म्हटल्यास अशा अर्थव्यवस्थेचें स्वरूप मागासलेलें रहाणें अपरिहार्य आहे. ही अपरिहार्यता टाळावयाची असल्यास सहकारी अर्थव्यवहारांत देखील राज्याच्या आर्थिक क्षेत्राला स्थान द्यावें लागेल. अशा परिस्थितींत केंद्रीकरण टाळण्याचे दोनच मार्ग शिल्लक रहातात असें वाटतें : एक म्हणजे या क्षेत्रांतील आर्थिक व्यवहार चालविण्यासाठीं स्वायत्त कंपन्यांच्या तंत्राचा उपयोग; आणि दुसरा, खऱ्याखुऱ्या विकेंद्रित स्वरूपाच्या लोक-राज्याची उभारणी. या दोन मार्गांनीं आधुनिक तंत्राचा उपयोग करणें व तो करीत असतां केंद्रीकरणाचा धोका टाळणें शक्य होईल असें वाटतें.

सहकारी आंदोलनाविषयीचा तिसरा आक्षेप हा बव्हंशीं राजकीय दृष्टिकोणांतून उद्भवणारा आहे. अर्थव्यवहार सहकारी तत्त्वावर उभारल्यानें प्रस्थापित आर्थिक हितसंबंधास धोका पोहोचणें स्वाभाविक आहे. यामुळें अशा प्रयत्नाला या हितसंबंधांकडून विरोध होणारच. यामुळें ही विरोधाची शक्यता नाहींशी केल्यावांचून सहकारी अर्थव्यवहाराची उभारणी होणें अशक्य आहे. म्हणून सहकारी चळवळीनें देखील भांडवलशाही अर्थव्यवस्था नष्ट करण्यासाठीं आवश्यक असलेल्या राजकीय प्रयत्नांत भागीदार झालें पाहिजे. सहकारी अर्थव्यवहाराचें इष्टत्व मान्य व अमान्य अस-णाऱ्या दोघांकडूनहि हा आक्षेप घेण्यांत येतो. म्हणून त्यासंबंधीं आणखी थोडेसें विवेचन करणें जरूर आहे.

भांडवलशाही सामान्य नागरिकाच्या दृष्टीनें अड-चणीची व असुरक्षिततेची परिस्थिति निर्माण करते या-बद्दल दुमत होण्याचें कारण नाहीं. यामुळें ती अर्थ-व्यवस्था राज्यसत्तेच्या साहाय्यानें नष्ट करण्याचा मार्ग पुढें मांडला जातो; व त्यासाठीं भांडवलशाहीविरोधी शक्तींचें सामर्थ्य वाढवणें आणि अखेरीस त्यांना सत्तारूढ करणें ही कल्पना पुढें येते. तथापि या मार्गाचा फोलपणा आतां प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध झाला आहे. या मार्गानें सामान्य नागरिकाचा प्रश्न सुटण्या-ऐवजीं अधिक बिकट बनतो. भांडवलदारांच्याऐवजीं सर्वंकष राज्यसत्तेची गुलामी त्याला पत्करावी लागते. राज्यसत्ता बदलल्यावांचून आर्थिक बदल अशक्य आहे या प्रमेयावर या विचारसरणीची उभारणी झाली असल्यानें सत्तारूढ होऊं पहाणाऱ्या राजकीय पक्षाची शरणागतीच सामान्य नागरिकाला पत्करावी लागते. याउलट व्यक्तिस्वातंत्र्य, स्वेच्छाजन्य प्रयत्न आणि सामान्य नागरिकाचा आत्मविश्वास यांविषयीं आदर बाळगणारी सहकारी चळवळ या मार्गाचा स्वीकार करूं शकत नाहीं. कारण हीं मूल्यें त्या मार्गानें अनुभवास येण्याऐवजीं नष्ट होण्याच्या मार्गास लाग-तात. सहकारी आंदोलनाचा भांडवलशाही विरोध हा विधायक स्वरूपाचा आहे असें म्हटलें जातें. याचा अर्थ हा कीं अनाकलनीय आर्थिक शक्तींच्या गुलामगिरींतून बाहेर पडण्यासाठीं अनियंत्रित राजकीय शक्तींना शरण जाण्याची कल्पना या आंदोलनास मान्य नाहीं. उलट, आर्थिक व्यवहाराची शक्य तों योग्य स्वरूपांत मांडणी करून आपल्याच प्रयत्नांनीं आपले प्रश्न सोडविण्याच्या कल्पनेवर त्याचा कटाक्ष आहे. या पद्ध-तीनें आर्थिक प्रश्न पूर्णपणें सुटूं शकतील कीं नाहीं या-विषयीं शंका घेण्यास जागा आहे. तथापि तो सोडविण्या-चा हा प्रयत्न सामान्य माणसाची विवेकशीलता व आत्मविश्वास वाढीस लावणारा आहे हें मात्र निर्विवाद आहे. या प्रयत्नाच्या प्रगतीविषयीं विचार करतांना, राज्यसत्ता आर्थिक क्षेत्रांत वर्चस्व असणाऱ्यांच्या करवींच चालवली जाते, हा सिद्धान्त तपासून पहाणें








आवश्यक ठरतें. त्यांत मुळींच तथ्य नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. तथापि तो सर्वस्वी खराहि नाहीं. यामुळें सहकारी आंदोलनाचा विकास लोकशाही राजकारणाशीं संबद्ध करणें शक्य व आवश्यक आहे. आणि राज्यसत्तेचा प्रश्न अशा प्रकारें सोडविला गेला म्हणजे सामान्य नागरिकांचा आत्मविश्वास वाढविणाऱ्या या आंदोलनास प्रस्थापित हितसंबंधाच्या विरोधाचा बागुलबुवा करण्याचें प्रयोजन रहाणार नाहीं. हा विरोध होणारच नाहीं असें नाहीं. तथापि त्याच्याशीं यशस्वीपणें सामना करण्याचें सामर्थ्य देखील चळवळींत निर्माण होईल. यामुळें त्याविषयीं भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

सहकारी चळवळीचें स्वरूप, तिचें उद्दिष्ट व वैचारिक अधिष्ठान यांविषयीं येथवर विचार केल्यानंतर पुनः देशांतील आंदोलनाकडे वळणें इष्ट होईल. आतांपर्यंतच्या विवेचनावरून या आंदोलनाबाबतच्या कांहीं गरजा स्पष्ट होतात. यांतील पहिली महत्त्वाची गरज म्हणजे त्याला योग्य वैचारिक अधिष्ठान प्राप्त होणें ही होय. केवळ सहकारी संस्थांची संख्यावाढ होण्याऐवजीं किंवा ती होण्याबरोबरच, सहकारी चळवळीबाबतच्या योग्य दृष्टिकोणाचा सामान्य जनतेंत फैलाव होईल अशा प्रकारच्या लोकशिक्षणाचा कार्यक्रम हातीं घेतला जाणें जरूर आहे. या कार्यामुळें चळवळीला स्थैर्य प्राप्त होऊं शकेल व संस्थांच्या वाढीबरोबरच त्यांची तांत्रिक कार्यक्षमताहि सुधारेल. सहकारी संस्थांबाबत आर्थिक व्यवसाय हा मर्यादित दृष्टिकोण नाहींसा होईल. आणि त्यांचें यशापयश केवळ वार्षिक ताळेबंदावरून ठरवलें न जातां कार्यकर्त्यांच्या व सभासदांच्या कोणत्या प्रवृत्तींना त्या आवाहन करतात व सभोंवतालच्या परिस्थितीवर त्यांचा काय परिणाम होतो यावरून तें ठरविण्याची प्रवृत्ति निर्माण होईल. चळवळीची या दिशेनें उभारणी होण्यासाठीं शासनसंस्थेचा आज तिच्यावर असलेला ताबा नाहींसा होणें आणि तिला खरेंखुरें स्वेच्छाजन्य चळवळीचें स्वरूप प्राप्त होणें अत्यंत आवश्यक आहे. सुवर्णमहोत्सवाच्या निमित्तानें सहकारी चळवळीविषयीं या दृष्टीनें विचार होण्याची गरज आहे. तसें झाल्यास या चळवळीचा भावी काल उज्ज्वल होऊं शकेल असें वाटतें.

---

## पुरे आतां हेवेदावे !

देवळाच्या पायरीला
वाटे कळसाचा हेवा
कळसाच्या अंतरींही
असूयेचा बारकावा
वेध घेतो अनिमिष
अवकाशीं रिघे दृष्टि
दंभ अंतरांत छूपा...
तुच्छ चराचर सृष्टि
उपा स्वप्निल डोळ्यांनीं
सोनें उधळित येतां
खुले हेमकांति, परि
आंत कोंडली जडता
कसें पायरीला ठावें –
काय खुपे अंतरांत
कळसाच्या ? ... उगी छुरे
स्वप्नें सोनेरी घोळत
देवद्वारीं क्षणभरी
लवे भाविकांचा माथा
चाऱ्ही मुक्ती, पायरीशीं
गाजे तुकोबाचा गाथा
साधुसंतपदस्पर्शें
होते पुनीत पायरी
कावळ्यांच्या बसण्याचें
शल्य कळसाच्या उरीं !
' भाग्य खरें पायरीचें '
– देव बोले गाभाऱ्यांत
वाऱ्यावरी कळसाची
चाले निरर्थ वरात
खोटा सोनेरी मंदील
ढोंगी बगळ्याचें ध्यान
कडा पायरीची करी
जड कासावीस मन
पायरीच्या मुखावरी
ढाळी कळस आंसवें
देव जागा राउळांत
पुरे आतां हेवेदावे !

— गणेश पाठक








श्री. कृ. ना. फडके

# पाक-अमेरिका लष्करी करार

'नवभारता'च्या मे १९५४ च्या अंकांत श्री. व. भ. कर्णिक ह्यांनीं पाक-अमेरिका लष्करी कराराला भारत-सरकारकडून व जनमताकडून जो निकराचा विरोध दर्शविण्यांत येत आहे, तो किती अज्ञानमूलक, निरर्थक व कांगावखोरपणाचा आहे ह्याचें विवेचन केलें आहे. हा विषय भारत-पाकिस्तान ह्यांच्यामधील परस्परसंबंधाच्या दृष्टीनें अत्यंत जिव्हाळ्याचा आहे ही गोष्ट ह्या कराराच्या ज्या प्रतिक्रिया भारत व पाकिस्तान ह्या दोन्ही देशांत घडून आल्या त्यावरून स्पष्ट झालेली आहे. शिवाय ह्या कराराचे जे प्रतिध्वनी साऱ्या जगभर उठले ते पहातां जागतिक राजकारणाच्या दृष्टीनें देखील हा करार ही एक महत्त्वपूर्ण व दूरगामी घटना ठरणारी आहे ही गोष्ट देखील स्पष्ट झालेली आहे. तेव्हां ह्या घटनेचा सर्वांगीणपणें विचार होणें इष्ट आहे. कारण सावध लोकमत स्वातंत्र्याची रखवाली करण्याचें एक प्रभावी हत्यार आहे. वरील सर्व कारणांसाठीं श्री कर्णिक ह्यांनीं ह्या कराराची एक उपेक्षित बाजू पुढें मांडली हें ठीक झालें. पाक-अमेरिका कराराची इतकी सविस्तर कैफियत पुढें आल्यानें ह्या वादामधील विवाद्य मुद्यांचा सप्रमाण विचार होण्यास मदत होणार आहे.

प्रथम श्री. कर्णिक ह्यांनीं ह्या कराराची व्यापक पार्श्वभूमि कोणती आहे ह्याचें स्पष्टीकरण केलें आहे. हा करार म्हणजे सोव्हिएट रशिया व अमेरिका ह्या दोन बलाढ्य राष्ट्रांमधील संघर्षाचा एक परिणाम आहे. श्री. कर्णिक म्हणतात: "दुसऱ्या महायुद्धानंतर सोव्हिएत रशियानें आपल्या साम्राज्याचा खूप विस्तार केला आणि स्वतःचें सामर्थ्य अनेक पटींनीं वाढविलें. शिवाय साम्यवाद ही एक आक्रमक स्वरूपाची शक्ति आहे आणि पसरणें हा तिचा स्वाभाविक गुणधर्म आहे. त्यामुळें अमेरिका-आदीकरून लोकशाही राष्ट्रांना सोव्हिएत रशियाची व साम्यवादाची अधिकच धास्ती वाटूं लागली. अमेरिकेच्या नेतृत्वाखालीं युरोपमधील राष्ट्रांनीं १९४७ पासून जे एकजुटीचे प्रयत्न केले त्यामुळें युरोपमधील रशियाच्या आक्रमणाला पायबंद पडला. पश्चिमेकडे पायबंद पडला तेव्हां रशियाचें लक्ष पूर्वेकडे म्हणजे आशियाकडे वळलें आणि आशियांतील देश आपल्या वर्चस्वाखालीं आणण्याचे त्याचे प्रयत्न सुरू झाले. या प्रयत्नामुळें युरोपमध्यें उभारली तशाच तऱ्हेची संरक्षक फळी आशियामध्येंहि उभारली पाहिजे असें अमेरिकेला वाटूं लागलें. पाक-अमेरिका लष्करी करार हा या संरक्षक योजनेचा एक महत्त्वाचा भाग आहे."

परंतु ज्या अमेरिकेनें सोव्हिएत रशियाच्या संभाव्य आक्रमणाविरुद्ध ही जगड्व्याळ तटबंदी उभारण्याचा खटाटोप चालविलेला आहे, ती अमेरिका साम्राज्यशाही राष्ट्र आहे किंवा नाहीं ? कारण साम्राज्यशाही राष्ट्र असल्यास ह्या तटबंदीच्या आंत समाविष्ट झालेलीं राष्ट्रें अमेरिकेचीं अंकित अथवा मांडलिक कशावरून होणार नाहींत ? ह्या आक्षेपांत श्री. कर्णिक ह्यांच्या मतें कांहीं तथ्य नाहीं. "जुन्या तऱ्हेची साम्राज्यशाही ही आतां एक पुराणवस्तू बनली आहे. बाजारपेठ मिळावी, भांडवल गुंतविण्यासाठीं क्षेत्र लाभावें व गडगंज नफा कमवितां यावा म्हणून जुन्या काळीं साम्राज्यवादी राष्ट्रें मागासलेल्या राष्ट्रावर आपलें वर्चस्व प्रस्थापित करीत असत. आज ती परिस्थिति उरलेली नाहीं. अमेरिका आज इतर राष्ट्रांचें शोषण करण्याऐवजीं भरणपोषण करीत आहे." तेव्हां श्री. कर्णिक ह्यांच्या मतें साम्राज्यशाहीसंबंधींच्या जुन्या कल्पनेप्रमाणें विचार करून या नवीन धोरणाचा अन्वयार्थ लागणार नाहीं. तेव्हां प्रथम दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेनें इतर राष्ट्रांचें भरणपोषण करण्याचें जें धोरण स्वीकारलें आहे व जगतापुढें साम्राज्यशाहीचा जो अभिनव आदर्श मांडला आहे त्याचें व्यावहारिक स्वरूप काय आहे याचा थोडा विचार करावयास पाहिजे.

दुसऱ्या युद्धाच्या काळांत अमेरिकेच्या उत्पादन-

क्षमतेंत जवळजवळ पांच पटींनीं वाढ झाली. ही वाढ होण्याचें कारण युद्धामुळें युरोपियन राष्ट्रांच्या उत्पादन-क्षमतेची प्रचंड प्रमाणांत हानि झाली व जपान युद्धांत पडेपर्यंत दोन्ही बाजूच्या युध्यमान राष्ट्रांच्या बाजार-पेठांचा फायदा अमेरिकेला भरपूर घेतां आला. ह्या काळांत जगाच्या बाजारपेठेंत अमेरिकेला कोणी प्रति-स्पर्धी उरलेला नव्हता. शांतता प्रस्थापित झाल्यानंतर अमेरिकेच्या एवढ्या प्रचंड उत्पादनाला बाजारपेठ मिळणें शक्य नव्हतें. युरोपांतील राष्ट्रांची युद्धामुळें एवढी प्रचंड हानि झालेली होती कीं, गरजवंत असूनदेखील अमेरिकेकडून माल खरेदी करणें त्या राष्ट्रांना अशक्य होतें. अमेरिकेनें मार्शल-योजना जी आंखली ती ह्या पेंचप्रसंगाला तोंड देण्यासाठीं आंखली. अमेरिकेकडून घ्यावयाच्या मदतीचा विनियोग कसा करावयाचा ह्यावर अमेरिकेचें नियंत्रण रहाणार असल्यानें, सोव्हिएत यूनियननें ह्या योजनेंत सामील होण्यास नकार दिला. मार्शल-योजनेच्या द्वारा अमेरिकेनें युरोपियन राष्ट्रांच्या उत्पादनव्यवस्थेवर स्वतःचें नियंत्रण बसविलें आणि स्वतःच्या देशामधील पैदाशीला कृत्रिम पण हुकमी बाजारपेठ निर्माण केली. मार्शल-योजना व इतर आर्थिक मदतीच्या योजना म्हणजे अमेरिकेंत पैदा होणारा माल कर भरणाऱ्या अमेरिकन नागरिकांना विकून नफा उकळण्याची तेथील मिरासदार भांडवलदारांनीं योजिलेली एक क्लृप्ति होती. सकृद्दर्शनीं निर्यात माल परकीयांना विकावयाचा असल्यानें त्यांत भरमसाट नफा उकळला तरी स्वजनद्रोहाचा किंवा स्वराष्ट्रद्रोहाचा दोष मिरासदार भांडवलदारांच्या पदरीं येणार नव्हता. १९४६ ते १९५२ पर्यंत ह्या परोपकारी साम्राज्यशाहीनें निरनिराळ्या राष्ट्रांना मिळून एकूण ३६ हजार कोटी अथवा ३६ अब्ज डॉलर्सची मदत दिली.[१] १९४८ ते १९५२ या पांच वर्षांत अमेरिकेच्या भांडवलशाही देशांशीं झालेल्या परराष्ट्रीय व्यापारांत अमेरिकेच्या व्यापारशेषाची रक्कम दरसाल जवळजवळ ३४० कोटी डालर्सनीं वाढत गेली. युद्धपूर्व १९३५ ते ३८ ह्या सालांत व्यापारशेषाची ही रक्कम सरासरी ३७॥ कोटी डॉलर्स होती. अमेरिकन साम्राज्यशाहीनें आपली बाजारपेठ वाढविण्यासाठीं दुसऱ्या राष्ट्रांवर आपलें प्रभुत्व प्रस्थापित करण्याचा हव्यास सोडून दिलेला आहे ह्या विधानांत कितपत तथ्य आहे हें ह्यावरून कळून येईल.

अमेरिकन साम्राज्यशाही म्हणजे जुनीपुराणी केवळ मागासलेल्या देशावर प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठीं हपापलेली साम्राज्यशाही नव्हे हें श्री. कर्णिक ह्यांचें विधान निखालस चुकीचें आहे असें नव्हे. अमेरिकन भांडवलशाही ही मिरासदारी भांडवलशाहीच्या परिपक्व अवस्थेमध्यें अवतरलेली साम्राज्यशाही असल्यानें तिच्यांत नावीन्य खास आहे. ह्या नव्या साम्राज्यशाहीच्या विस्ताराचे डावपेंच ब्रिटिश किंवा फ्रेंच ह्या मोडकळीस आलेल्या साम्राज्यशाह्यांहून निराळे आहेत. औद्योगिक दृष्ट्या मागासलेले सर्व देश जुन्या साम्राज्यशाह्यांच्या प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष पकडींत गोंवले गेले असल्यानें, प्रथम ह्या जुन्या साम्राज्यशाही राष्ट्रांना आपल्या पकडींत आणून नंतर त्यांच्या अंकित असलेल्या अथवा त्यांच्याशीं आर्थिक दृष्ट्या निगडित असलेल्या देशांकडे आपला मोर्चा वळवावयाचा अशी नवी रणनीति अमेरिकन साम्राज्यशाहीनें कार्यवाहींत आणलेली आहे.

---

१ १९४८–१९५२ या काळांत अमेरिकेच्या निर्यात व्यापाराची किती प्रचंड प्रमाणांत वाढ झाली हें खालील आंकडेवारीवरून दिसून येईल.

( आंकडे दशलक्ष डॉलर्सचे )

| वर्ष | आयात | निर्यात | परराष्ट्रीय व्यापारशेष |
|---|---|---|---|
| १९४८ | ७८०१ | १२५३२ | ४७३१ |
| १९४९ | ७२५१ | ११९३६ | ४६८५ |
| १९५० | ९६१७ | १०१४२ | ५२५ |
| १९५१ | ११८९३ | १४८६८ | २९७५ |
| १९५२ | १०५०० | १४७०० | ४२०० 'अंदाजी' |








## पाक-अमेरिका लष्करी करार

अमेरिकन साम्राज्यशाहीनें दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत जमविलेल्या गडगंज भांडवलाचा उपयोग केवळ इतर राष्ट्रांचें 'भरणपोषण' करण्याकडे केला असा श्री. कर्णिक ह्यांनीं समज करून घेतलेला दिसतो. परंतु ह्या उदारधी साम्राज्यशाहीनें आपल्या भांडवलाची पेरणी अन्यप्रकारें देखील केलेली आहे ही गोष्ट नजरेआड करून चालणार नाहीं. गेल्या दहा वर्षांच्या काळांत अमेरिकन साम्राज्यशाहीनें परदेशांत गुंतविलेल्या भांडवलाच्या वाढीचें प्रमाण उपेक्षणीय नाहीं. खालील आंकडेवारीवरून ही गोष्ट स्पष्ट होईल :

**अमेरिकेनें परदेशांत गुंतविलेलें भांडवल**

| | |
|---|---|
| १९४३ | ८०० कोटी डालर्स |
| १९५० | १२०० ,, ,, |
| १९५२ | १४०० ,, ,, |

ह्यापैकीं बरेचसें भांडवल कॅनडा, लॅटिन अमेरिकन देश व मध्यपूर्व देश ह्यांमध्यें गुंतविलेलें आहे. परंतु ह्या काळांत ब्रिटनसारख्या साम्राज्यशाहीच्या माहेरघरीं जें भांडवल गुंतविलें त्यांतहि तितक्याच वेगानें वाढ झालेली दिसून येते :

**अमेरिकेचें ब्रिटनमध्यें गुंतविलेलें भांडवल**

| | |
|---|---|
| १९३६ | ४८ कोटी डॉलर्स. |
| १९४३ | ५२ कोटी डॉलर्स |
| १९५० | ८४ कोटी डालर्स. |

म्हणजे युद्धपूर्व कालाशीं तुलना करतां ब्रिटनमध्यें गुंतविलेल्या अमेरिकेच्या भांडवलांत ८०% वाढ झाल्याचें दिसून येतें. ब्रिटन हें भांडवलशाही जगांतील औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीनें दुसऱ्या नंबरचें व भांडवलशाही अर्थकारणाच्या अनुभवाच्या दृष्टीनें पहिल्या नंबरचें राष्ट्र आहे ही गोष्ट लक्षात घेतां अमेरिकेनें केलेली ही प्रगति जुन्या साम्राज्यशाही राष्ट्रांना हेवा वाटावयास लावणारी आहे. अमेरिकन सरकारच्या अधिकृत अहवालावरून ब्रिटनमध्यें गुंतविलेल्या भांडवलावर अमेरिका आज दरसाल ६ कोटी डॉलर्स इतका नफा कमवीत आहे. ब्रिटनमध्यें गुंतविलेल्या भांडवलाशिवाय अंदाजें ह्याच अवधींत अमेरिकेनें कॅनडांत गुंतविलेले ८०० कोटी डॉलर्स, आस्ट्रेलियांत गुंतविलेले ४६ कोटी ७० लक्ष डालर्स – इतकें भांडवल व इतर ब्रिटिश वसाहतींत गुंतविलेलें भांडवल व त्यावरील नफा हिशेबांत घेतां अमेरिकेनें ब्रिटनला १९५३ जून अखेर मदत म्हणून दिलेल्या अदमासें १७२ कोटी डॉलर्सच्या मदतीचा ओघ नफ्याच्या व व्याजाच्या रूपानें अमेरिकेच्या तिजोरींत केव्हांच परत येऊन पोहोंचला असला पाहिजे. परराष्ट्रांचें भरणपोषण करण्याच्या अमेरिकन साम्राज्यशाहीच्या उदार व निःस्वार्थी अर्थकारणाचा हा पोटउकाला केवळ उदाहरण म्हणून दिलेला आहे.

अमेरिकेनें भांडवलशाही राष्ट्रांना दिलेली ३ हजार ६०० कोटी डॉलर्सची मदत दिली नसती तर अमेरिकेला निर्यात व्यापारांत त्या रकमेहून अधिक खोट पत्करावी लागली असती असा अभिप्राय खुद्द अमेरिकेच्या व्यापारखात्याच्या एका प्रवक्त्यानें व्यक्त केलेला आढळतो.

मार्शल-योजनेच्या पाठोपाठ युरोपियन राष्ट्रांवर अटलांटिक-कराराच्या उपकाराचा जो बोजा लादण्यांत आला, त्या पायीं तीं राष्ट्रें आर्थिक दृष्ट्या आज टेंकीला आलेलीं आहेत. ह्या करारान्वयें ब्रिटनला जी शस्त्रास्त्रवाढ करावी लागली त्यामुळें ब्रिटनचा संरक्षणखात्याचा खर्च १९३७–३८ सालीं १९ कोटी ७३ लक्ष पौंड होता तो आज १७७ कोटी ६० लक्ष पौंडांवर गेलेला आहे. आणि ह्या बोजानें हैराण झाल्यामुळें अटलांटिक करारानुसार जी शस्त्रास्त्रवाढ करण्याचें ब्रिटननें आपल्याला बांधून घेतलें आहे तिच्यांत कांहीं सवलत मिळावी म्हणून लाचारीनें अमेरिकेची आळवणी करण्यासाठीं ब्रिटनच्या अर्थमंत्र्यांना अमेरिकेच्या वाऱ्या कराव्या लागत आहेत. अमेरिकेच्या आर्थिक मदतीनें ब्रिटनच्या स्वातंत्र्यावर बंधन पडलेलें नाहीं ह्या श्री. कर्णिक ह्यांच्या म्हणण्यांत कितपत तथ्यांश आहे ह्याची कल्पना वरील विवेचनावरून येईल. ह्याहून सविस्तर विवेचन करणें हें प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें आवश्यक आहे असें वाटत नाहीं.

इण्डोचायनामधील युद्धाची व्याप्ति वाढविण्यासंबधीं अमेरिकेचे परराष्ट्रमंत्री डलेस ह्यांनीं केलेल्या घोषणांचे जे पडसाद ब्रिटिश पार्लमेंटमध्यें उठले, त्या पडसादांवरून आर्थिक मदतीच्या पाठोपाठ ब्रिटनच्या राजकीय स्वातंत्र्यावर पडलेल्या पाशांचे करकोचे होअर बेलिशा ह्या हुजूरपक्षीय मुत्सद्द्यापासून आजवर अमेरिकेच्या औदार्याचे गोडवे गाणाऱ्या क्लेमंट अॅटली ह्या मजूरपक्षीय नेत्यापर्यंत सर्वांना किती जाणवत आहेत












ह्याचा भरपूर पुरावा मिळूं शकेल. श्री. कर्णिक ह्यांनीं भारतांतील ब्रिटिश हाय कमिशनर ह्यांनीं मद्रास येथें केलेल्या एका भाषणाचा जो हवाला दिलेला आहे, त्याला ब्रिटिश पार्लमेंटमधील वर उल्लेखिलेल्या वादविवादांत समर्पक उत्तर सांपडूं शकेल.

भारतानें अमेरिकेकडून आर्थिक मदत घेऊनहि भारत स्वतंत्र राहूं शकतो, ह्याला जागतिक परिस्थिति, भारतामधील लोकशाही व साम्राज्यविरोधी लढ्यांची परंपरा, तसेंच वसाहतदेशांत उफाळून आलेला रसरशीत व लढाऊ राष्ट्रवाद हीं कारणीभूत आहेत. शिवाय आर्थिक मदतीच्या संभाव्य परिणामाच्या धोक्यासंबंधीं भारत-सरकार व भारतीय जनता अधिक सावध आहेत.

श्री. कर्णिक ह्यांच्या मतें रशियन आक्रमणाच्या धास्तीनें अमेरिकेची लष्करी मदत घेणें पाकिस्तानला जरूरीचें वाटलें, म्हणूनच त्यानें लष्करी कराराचा हा मनसुबा रचला. अमेरिका – पाक लष्करी कराराच्या समर्थनार्थ हा युक्तिवाद पाकिस्तानच्या कोणाहि जबाबदार मुत्सद्द्यानें आजवर पुढें मांडलेला नाहीं, ही गोष्ट येथें लक्षांत घ्यावयास पाहिजे. येवढेंच नव्हे तर पाकिस्तान व सोव्हिएत रशिया ह्यांचे संबंध मित्रत्वाचे आहेत असा निर्वाळा पाकिस्तानचे मुख्य मंत्री महमदअली व परराष्ट्रमंत्री झाफरुल्लाखान ह्यांनीं ह्या करारासंबधीं वाटाघाटी चालूं असतां दिलेला आढळेल.

ह्या कराराविरुद्ध सोव्हिएत यूनियननें जो निषेधपर खलिता पाकिस्तान-सरकारकडे धाडला त्यांत, ह्या करारानें पाकिस्तान अमेरिकेच्या मध्यपूर्वेकडील सोव्हिएतविरोधी आक्रमक राजकारणांत गोंविला जात आहे व त्यामुळें जागतिक शांततेंत व पाकिस्तान व रशिया ह्यांच्यामधील संबधांत बिघाड होईल व पाकिस्तानच्याहि स्वातंत्र्यावर घाला येईल येवढींच कारणें नमूद केलेलीं आहेत. आजमितीपर्यंत सोव्हिएत रशिया व पाकिस्तान ह्यांच्या दरम्यान वादाचा एकहि मुद्दा उपस्थित झालेला नाहीं. मग तो विकोपाला गेला असणें तर दूरच !

श्री. कर्णिक ह्यांचा आणखी एक मुद्दा असा कीं, अमेरिका-पाकिस्तान करार हें रोगाचें मूळ नसून रोगाचें लक्षण आहे. कर्णिकांचा हा मुद्दा कोणालाहि पटण्यासारखा आहे. मतभेद होत असेल तर तो रोगाचें मूळ कोठें आहे ह्यासंबंधीं. श्री. कर्णिक ह्यांच्या मतें तें मूळ भारत व पाकिस्तान ह्यांच्यामध्यें जे मतभेद निर्माण झालेले आहेत व जें भीतीचें व संशयाचें वातावरण पसरलेलें आहे त्यांत आहे. आमच्या मतें तें मूळ ज्या राजनीतीच्या पोटीं तुर्कस्तान-अमेरिका करार जन्मास आला व जिच्यापोटीं पाकिस्तान-अमेरिका लष्करी करार व तुर्कस्तान-पाकिस्तान करार ह्या दोन्ही करारांच्या मनसुब्यांचा गर्भ गेलीं कांहीं वर्षे वाढत होता त्या अमेरिकेच्या मध्यपूर्वेकडील कुटिल राजनीतींतच शोधला पाहिजे. ह्याची जाणीव खुद्द भारतसरकारला व भारतीय जनतेला असल्यामुळें ह्या कराराला भारतांत जो विरोध झाला त्याचा रोख प्राधान्येंकरून पाकिस्तानपेक्षां अमेरिकेच्या विरुद्धच होता. ह्या विरोधामुळें पाकिस्तानच्या राज्यकर्त्यांच्यापेक्षां अमेरिकेच्या राज्यकर्त्यांचीं माथींच अधिक भडकलीं त्याचेंहि कारण तेंच. हिंवतापाचें मूळ रोग्याला भरणाऱ्या हुडहुडींत नसून डासांच्या चाव्याच्या विषांत असतें. हाच न्याय ह्या कराराचें मूळ शोधतांना ध्यानीं ठेविला पाहिजे.

श्री. कर्णिकांच्या मतें, “ अमेरिकेनें पाकिस्तानला देऊं केलेल्या मदतीचा आंकडा दोनतीनशें दशलक्ष-डॉलर्सच्या पलीकडे जाईल असें दिसत नाहीं. तेव्हां त्या मदतीनें पाकिस्तानच्या लष्करी सामर्थ्यांत होणारी वाढ भारताच्या लष्करी सामर्थ्याच्या तुलनेनें उपेक्षणीय म्हटली पाहिजे. तेवढ्या मदतीवर दुभंगलेला व औद्योगिक दृष्ट्या मागासलेला पाकिस्तान देश हिंदुस्थानवर आक्रमण करील असा कांगावा करण्यांत अर्थ नाहीं. ” पण ही मदत जर येवढी उपेक्षणीय असेल व त्याच्या परिणामाचें क्षेत्र केवळ मदतीच्या रकमेच्या आंकड्यावरून परिमित होणारें असेल तर रशियन आक्रमणाच्या धास्तीमुळें पाकिस्ताननें अमेरिकेची मदत घेतली ह्या म्हणण्यांतहि कांहीं अर्थ रहात नाहीं. इतकी क्षुल्लक मदत घेऊन सोव्हिएत रशियाचा रोष ओढवून घेण्यापेक्षां आणि भारत–अफगाणिस्तान इत्यादि शेजारी राष्ट्रांमध्यें स्वतःविषयीं अढी निर्माण करण्यापेक्षां अथवा असलेल्या अढीला पीळ चढविण्यापेक्षां ती मदत न घेणें हेंच पाकिस्तानच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें व इतर हितसंबंधांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें अधिक शहाणपणाचें ठरलें नसतें काय ?

श्री. कर्णिक ह्यांच्या मतें पाकिस्तानकडून ह्या करा-








राचा भारताविरुद्ध उपयोग करण्यांत आल्यास त्याचें पारिपत्य करण्यासाठीं अमेरिका आपल्या प्रयत्नांची शिकस्त करील असें स्पष्ट आश्वासन प्रेसिडेंट आयसेनहॉअर ह्यांनीं पंडित नेहरूंना लिहिलेल्या पत्रांत दिलेलें आहे; तेव्हां पाकिस्तान अमेरिकेकडून मिळालेल्या मदतीचा उपयोग हिंदुस्थानविरुद्ध काश्मीरांत किंवा इतरत्र करील अशी धास्ती बाळगण्याचें खरोखरच कांहीं कारण उरत नाहीं. श्री. कर्णिक ह्यांच्या ह्या मुद्द्याला एवढेंच उत्तर देतां येईल कीं कोणाहि जबाबदार राजकारणी पुरुषाला विश्वासाच्या बाबतींत इतकें गहाळ राहून चालणार नाहीं. आज पाकिस्तानचीं सैन्यें काश्मीरच्या भूमीवर असतांना पाकिस्तानच्या फौजांनीं काश्मीरवर आक्रमण केलें आहे असें म्हणावयास अमेरिका कोठें तयार आहे ? मग त्या पाकिस्तानी फौजांचे हात बळकट करण्यासाठीं अमेरिकेकडून मिळालेल्या लष्करी साधनसामग्रीचा उपयोग पाकिस्तानकडून कांहींतरी निमित्तानें केला गेल्यास त्याला अमेरिका चढाई हें नांव खासच देणार नाहीं. आणि जोंपर्यंत काश्मीरचा प्रश्न सुरक्षासमितीपुढें घोळांत पडून राहील तोंपर्यंत अमेरिकेला अशी भूमिका घेतां येईल व अमेरिकेची ती भूमिका आंतरराष्ट्रीय कायद्याच्या दृष्टीनेंहि आक्षेपार्ह ठरणार नाहीं. बाकी; ब्रह्मदेशांत घुसलेल्या क्युओमिंगटँगच्या सेनांना 'अनधिकृत' परंतु अविरतपणें रसद पुरविणारें अमेरिकेसारखें राष्ट्र आंतरराष्ट्रीय कायद्याची कदर बाळगतें किंवा कितपत बाळगील ह्या वादांत येथें शिरण्याचें कारण नाहीं.

श्री. कर्णिक ह्यांनीं उपस्थित केलेल्या मुद्द्यांना उत्तर देतांना सोव्हिएत रशियाचें धोरण आक्रमक आहे किंवा नाहीं ह्या वादांत शिरण्याचें प्रस्तुत लेखांत टाळलें आहे. अमेरिकेच्या अर्थकारणाचें तथाकथित निःस्वार्थी व परोपकारी स्वरूप दाखविण्याचा जो श्री. कर्णिक यांनीं प्रयत्न केला आहे त्याचाच परामर्श प्रस्तुत लेखांत घेतला आहे.

एका बाबतींत मात्र मी श्री. कर्णिक ह्यांच्याशीं सहमत आहे. अमेरिका-पाक लष्करी करार ही एक गंभीर घटना आहे व त्या कराराच्या संभाव्य परिणामाविषयीं भारतसरकारनें व भारतीय जनतेनें सावधगिरी बाळगिली पाहिजे हें खरें. परंतु त्यामुळें घबराट निर्माण करण्याची चूक आपण कटाक्षानें टाळली पाहिजे. कारण चँग-काय-शेक, बाओ दाय ह्यांच्यासारख्या भाडोत्री व लाचार बारगिरांच्या फौजा उभ्या करून आपलें आक्रमक राजकारण पुढें नेण्याचें अमेरिकेचें राजकारण पदोपदीं अमेरिकेच्या आंगलट येत आहे.

---

श्री. का. झि. पाटील

# भारताची औद्योगिक प्रगति

आपल्या भारत–देशाची प्रगति व्हावी असें ज्यांना वाटतें त्यांच्यापुढें प्रथम औद्योगिक प्रगतीचा प्रश्न उभा राहतो. परंतु आज देशांत कोणताहि कारखाना उभारावयाचा म्हणजे दोन मोठे प्रश्न उभे राहतात. एक म्हणजे भांडवलाचा आणि दुसरा म्हणजे यंत्रसामग्री व तंत्रज्ञ लोकांचा होय. भांडवलाचा प्रश्न आस्ते आस्ते सुटणार आहे आणि त्याप्रमाणें हळुंहळुं आपल्या देशांत निरनिराळे कारखाने उभारले जाणार आहेत. परंतु आज कारखाना सुरू करायचा म्हणजे सर्व सामग्री मिळविण्यासाठीं परदेशाकडे पहावें लागतें. आणि ही परदेशांतून येणारी सामग्री एकदम आपल्याकडचीं माणसें कशी चालवूं शकणार ? त्यामुळें परदेशांतील तंत्रज्ञांना बोलावणें आवश्यक होऊन बसतें. आपल्याकडे चांगलें तंत्रज्ञ न मिळण्याचें कारण म्हणजे आपल्या शिक्षणपद्धतीचा दोष होय. सध्या दिल्या जाणाऱ्या शिक्ष-








णानें विद्यार्थ्यांस स्वतंत्र बुद्धि चालविण्याचें शिकविलें जात नाहीं. परीक्षेंत उत्तम प्रकारें पास कसें व्हावयाचें याची कला हस्तगत झाली म्हणजे संपलें. परंतु असे विद्यार्थी पुढें कारखान्यांत उतरले म्हणजे भांबावून जातात. अशा प्रकारें एक नाहीं म्हणून दुसरें नाहीं असें रहाटगाडगें सुरू आहे. त्यामुळें देशाच्या औद्योगिक प्रगतीला खूपच कालावधि लागणार यांत शंका नाहीं. तथापि अशाहि परिस्थितींत भारतसरकारनें या कार्यास खूपच धडाक्यानें सुरवात केली आहे हें कुणालाहि नाकबूल करतां येणार नाहीं.

औद्योगिक प्रगतीच्या योजनेंत संशोधन व कारखाने यांना सारखेंच महत्त्व दिलें आहे. देशांत उच्च दर्जाचे शास्त्रज्ञ व तंत्रज्ञ तयार व्हावेत व देशांत उत्तम प्रकारें संशोधन करतां यावें म्हणून भारतसरकारनें बारा राष्ट्रीय प्रयोगशाळा बांधल्या. हें काम आणखी वाढणार आहेच. परंतु आता सरकारनें कांहीं कारखाने काढण्यास पण सुरुवात केली आहे. आणि ते कारखाने काढतांना देशाच्या निकडीच्या गरजेला प्राधान्य देण्यांत आलें आहे.

भारताच्या शेतीला उत्तम प्रकारें जगविलें तर धान्याचा दुष्काळ पडणार नाहीं व अमेरिकेसारख्या देशाकडे त्यासाठीं बघावें लागणार नाहीं. म्हणून **सिंद्री येथें खतांचा कारखाना** प्रथम सुरू केला. हा कारखाना बांधतांना लागणाऱ्या वस्तूंचा खूपच खोलांत विचार केला आहे. हायड्रोजन आणि नायट्रोजन यापासून अमोनिया हा वायु तयार होतो. पाण्याची वाफ म्हणजे ऑक्सिजन व हायड्रोजनचा सांठा आणि नायट्रोजन हवेमध्यें भरपूर ( शें. ७८ टक्के ) आहे. तेव्हां हायड्रोजन व नायट्रोजन हे दोन वायू जगाच्या पाठीवर कुठेंहि मिळूं शकतील. परंतु खतांच्या कारखान्यासाठीं शक्ती(Power)करितां म्हणून कोळसा लागतो आणि चुना लागतो. तेव्हां राजस्थानमधून कॅल्शियम सल्फेट सिंद्रीला जाऊं लागलें. अमोनिया व कॅल्शियम सल्फेट यांपासून अमोनियम सल्फेट तयार होऊं लागलें. सिंद्री येथें कारखाना उभारण्याचें मुख्यतः कारण म्हणजे येथें मिळणारा दगडी कोळसा हें होय. याच कारखान्यांतून शेंकडों टन खत देशभर पाठविलें जातें. हा कारखाना आधुनिक पद्धतीनें बांधलेला आहे. येथें खूपच अनुभवी तंत्रज्ञांची आवश्यकता आहे यांत शंका नाहीं.

सध्यां **प्रांगारिक रसायनांचें** खूपच महत्त्व वाढलें आहे. कारण दररोजच्या जीवनांत लागणाऱ्या कित्येक वस्तू या प्रांगारिक पदार्थांच्या साहाय्यानें करतां येतात. प्लास्टिक, रंग, औषधें, रबर, कृत्रिम कापड इत्यादि पदार्थांच्या निर्मितीसाठीं प्रांगारिक पदार्थांची आवश्यकता असते. हे प्रांगारिक पदार्थ दगडी कोळशाच्या ऊर्ध्वपतना-(डिस्टिलेशन)पासून उपलब्ध होतात. त्यांत बेंझिन, टॉल्विन, नॅप्थॅलिन, ॲन्थ्रॅसीन इत्यादि पदार्थ मिळतात. या मूळ पदार्थांपासून इतर रासायनिक क्रियांनीं शेंकडों दुसरे पदार्थ मिळतात त्यांचाच कारखान्यांत उपयोग होतो. हेच पदार्थ अमेरिकेंत पेट्रोलियमपासून तयार करतात. कारण अमेरिकेंत खनिज तेलांचा भरपूर सांठा आहे. इंग्लंडमध्यें दगडी कोळशाचे आगरच आहे. तेथें हे प्रांगारिक पदार्थ दगडी कोळशापासून मिळतात. जर्मनीमध्यें दगडी कोळशाचा दोन तऱ्हेनें उपयोग केला आहे. एक म्हणजे नेहमींच्या ऊर्ध्वपतनाच्या पद्धतीनें आणि दुसरा म्हणजे कोळसा व चुना यापासून ॲसिटिलिन वायु तयार करायचा आणि त्यापासून शेंकडों प्रांगारिक पदार्थ तयार करायचे. हें सर्व सांगण्याचें कारण म्हणजे देशांत उपलब्ध असणाऱ्या सामग्रीप्रमाणें देशांत कारखाने सुरू होतात. भारताचा विचार करायचा तर प्रांगारिक पदार्थांचा कारखाना भारतांत नांव घेण्यासारखा नाहीं. बंगालमध्यें कोळसा मुबलक

असल्यामुळें बंगाल सरकारनें कोळशापासून प्रांगारिक पदार्थ तयार करण्याचें योजिलें आहे आणि कामाला या वर्षींच सुरवात झाल्याचें डॉ. बी. सी. रॉय यांनीं नुकतेंच जाहीर केलें आहे. हे प्रांगारिक पदार्थ आमच्या देशांत तयार होत नसल्यामुळें सध्यां प्लास्टिक, रबर, रंग किंवा औषधें यांचा कारखाना आमच्याकडे खऱ्या अर्थी निघूं शकत नाहीं. कारण प्रांगारिक रसायनासाठीं दुसऱ्या देशावर अवलंबून रहावें लागतें. भोरला रंगाचा कारखाना आहे पण रंगासाठीं ॲनिलीन पाहिजे असलें तर इग्लंड किंवा अमेरिकेकडे डोळे लावावे लागतात. परदेशांतून येणाऱ्या मालाला खूप उशीर लागतो. शिवाय तो महाग मिळतो. त्यामुळें भारतामध्यें रंग तयार केले तर ते कांहीं वेळा परदेशांतून येणाऱ्या रंगापेक्षां महाग पडतात आणि ते एवढे चांगलेहि दिसून येत नाहींत. त्याचें कारण कारखान्यांतील तुटपुंज्या सोयी आणि वाकबगार तंत्रज्ञांचा अभाव हेंच होय. त्याउलट रंगाच्या खपाच्या दृष्टीनें पाहिलें तर मुंबईला व इतरत्र शेंकडों कापडाच्या गिरण्या आहेत आणि तेथें टनावारी रंगाची जरूरी असते. सध्यां हे सर्व रंग परदेशांतून मागविले जातात. अलीकडे गुजराथमध्यें ' अतुल प्रॉडक्टस् ' नांवाचा कारखाना सुरू झाला असून तेथें ॲझो व इतर रंग तयार होऊं लागले आहेत. त्यामुळें गुजराथ व मुंबई येथील कापडगिरण्यांना त्याचा फायदा होईल.

भारतसरकारच्या योजनेप्रमाणेंहि कोळशापासून प्रांगारिक पदार्थ बंगालमध्यें तयार करून ते देशांतील निरनिराळया भागांत पुरविण्याचें ठरलें आहे. हा बंगालमधील प्रांगारिक पदार्थांचा कारखाना सुरूं झाला म्हणजे प्लास्टिक, रंग, रबर, स्फोटकें व औषधें यांचे कारखाने आपल्याकडे नीट चालूं लागतील.

प्रांगारिक पदार्थ देशांत तयार होणें निकडीचें झालें आहे. याचें कारण म्हणजे त्या अभावीं दुसरे कारखाने त्यामुळें जोमानें चालूं शकत नाहींत. प्लास्टिकची पावडर फक्त आपण परदेशांतून घेतों आणि येथें निरनिराळया वस्तू तयार करतों प्लास्टिकची पावडर तयार करण्यासाठीं प्रांगारिक पदार्थ लागतात. याप्रमाणें प्रत्येक कारखान्याची हीच अडचण आहे.

दिल्ली येथें डी. डी. टी. चा कारखाना सुरू होऊन या वर्षीं भारतांत डी. डी. टी. तयार होईल. आरोग्यासाठीं व शेतीसाठीं डी. डी. टी. चा खूपच उपयोग आहे हें आता सांगायला नको. जंतुनाशक म्हणून डी. डी. टी. चा उपयोग प्रत्येक माणसाला माहीत झाला आहे. या दिल्लीच्या कारखान्यासाठीं २२ लाख रुपये खर्च होणार आहेत. त्याचप्रमाणें पुण्याला सुरू होणाऱ्या पेनिसिलिनच्या कारखान्यास कांहीं अशीं प्रांगारिक पदार्थांची जरूरी भासणार आहे. बलसाड जिल्ह्यांतील ' अतुल प्राडक्टस् ' ऑरियोमायसिन, फॉलिक ॲसिड तयार करीत आहे. बडोद्याच्या साराभाई केमिकल्सनें अनेक औषधी पदार्थांची निर्मिति सुरूं केली आहे. अशा प्रकारें बऱ्याच कारखान्यांविषयीं सांगतां येईल. या प्रांगारिक पदार्थांच्या व तंत्रज्ञांच्या अडचणीमुळें कांहीं देशी कंपन्यांनीं परदेशी कंपन्यांचें सहकार्य घेतलें आहे.

देशाचा प्रांगरिक पदार्थांचा प्रश्न लवकरच सुटेल असें बंगालच्या मुख्य प्रधानांच्या भाषणावरून म्हणावयास हरकत नाहीं. त्यामुळें साहजिकच देशांत विविध कारखाने सुरूं होतील. हे कारखाने सरकारी किंवा खाजगी प्रयत्नानें सुरू होतील. पण या कारखान्यांच्या यंत्रांसाठीं पुन्हां परदेशाकडे बघण्याची वेळ येणार; त्या दृष्टीनें भारत सरकारनें **मशीनटूल्सचा कारखाना** सुरू केला आहे. या कारखान्यांतून निरनिराळीं यंत्रें तयार करण्यासाठीं लागणाऱ्या यंत्रांची निर्मिति होईल. या वर्षींच भारतांत








लेथमारखें मशीनटूल तयार होईल. लेथच्या साहाय्यानें यंत्राचे निरनिराळे भाग तयार करता येतात. अशा प्रकारें भावी कालांत उभारल्या जाणाऱ्या कारखान्यांची अडचण दूर होणार आहे. कारण या 'मशीनटूल्स' च्या कारखान्यांतून माल बाहेर येणार आहे.

हीं मशीन–टूल्स तयार करणें खरोखरींच कुशल तंत्रज्ञांचें काम आहे. भारतसरकारनें यासाठीं एका स्विस फर्मचें सहकार्य घेतलें आहे. त्यामुळें तंत्रज्ञांचा प्रश्न सुटला. परंतु हीं मशीन-टूल्स तयार करतांना जें लोखंड, पोलाद किंवा इतर धातू वापरले जातात त्यांची मोठी कसून तपासणी केली जाते. अनेक दृष्टींनीं परीक्षा केली जाते. तेव्हां या सर्व परीक्षांना टिकणारें लोखंड व पोलाद देशांत उपलब्ध झालें पाहिजे. आज तें एवढें शक्य नाहीं. खरें म्हणजे आपल्याकडे लोखंडाच्या खाणी बऱ्याच असल्या तरी देशांत होणारें लोखंड पुरेसें नाहीं. या दृष्टीनें विचार केला तर भारतांत चांगलें व मुबलक लोखंड मिळणें आवश्यक झालें आहे. त्यासाठीं भारत सरकारनें शंभर कोटी रुपयांचा मोठा कारखाना उभारण्याचें ठरविलें आहे. त्यासाठीं 'हिंदुस्थान स्टील कंपनी' नांवाची कंपनी स्थापन झाली आहे. यासाठीं क्रूप्स् व डेमाग् या प्रसिद्ध कंपनीचें सहकार्य घेतलें आहे. भारत-सरकार ८० कोटी रुपये देणार असून बाकी वीस कोटी रुपये यंत्रसामग्रीसाठीं क्रूप्स् व डेमाग् कंपनी खर्च करणार आहे. हा प्रश्न इतके दिवस प्रांतीय वादामुळें मागें पडला होता. तो कारखाना 'आमच्या प्रांतात उभारावा' असें चार प्रांतांचें म्हणणें पडलें. इतर बाकीच्या प्रांतांनीं मौन राखलें. कारण त्या प्रांतांत कोळसा व लोखंडाच्या खाणी नाहींत ! या अवाढव्य कारखान्यासाठीं हजारों टन दगडी कोळसा लागतो. लोखंडाची खाण पण जवळच पाहिजे. तेव्हां पश्चिम बंगालमध्यें दुर्गापूर, बिहारमध्यें सिंद्री, ओरिसामध्यें रोएरकला किंवा मध्यप्रांतांत बेल्हाई येथें हा कारखाना सुरू व्हावा असा वाद चालला होता. शेवटीं ओरिसामध्यें हा प्रचंड कारखाना सुरू होईल आणि त्या प्रांताची आर्थिक प्रगति करील असें मध्यवर्ती सरकारनें नुकतेंच जाहीर केलें आहे.

या सर्व दृष्टींनीं विचार करतां उद्योगधंदे सुरू करणें किती कठीण व अडचणीचें काम आहे हें लक्षांत येतें. परंतु सरकारला ह्या अडचणी सोडविल्या पाहिजेत, कारण त्याशिवाय औद्योगिक प्रगति व्हावयाची नाहीं आणि देशाची आर्थिक परिस्थिति सुधारणें शक्य होणार नाहीं. सध्यां व विशेषतः १९५४ मध्यें जे कांहीं कारखाने सुरू होत आहेत त्यांसाठीं बऱ्याच परदेशी तंत्रज्ञांनीं मदत केली आहे हें आपण विसरून चालणार नाहीं. परंतु हें परदेशी तंत्रज्ञांचें सहकार्य फार दिवस मिळणार नाहीं. म्हणून आपल्या देशांत चांगले चौरंगी तंत्रज्ञ तयार होणें आवश्यक झालें आहे.

ज्याप्रमाणें देशाची प्रगति व्हावी आणि त्यासाठीं उद्योगधंद्यांचें जाळें पसरावें असें सरकारी धोरणावरून दिसतें त्याप्रमाणें जनतेला किंवा उद्योगपतींना एवढें वाटतेंसें दिसत नाहीं. विशेषतः भांडवलदार किंवा इतर कारखानदार उद्योगधंद्यांत वाढ करावी ह्या मताचे दिसून येत नाहींत आणि या बहुतेक लोकांचा आरोप असा आहे कीं सध्यां सरकारनें देशी मालास प्रोत्साहन दिलेलें नाहीं. परदेशी माल आपल्या देशांत आणतांना त्या मालानें देशी मालाशीं स्पर्धा सुरू होते, देशी माल खपत नाहीं व देशी कारखानदार निराश होतात किंवा गिऱ्हाइकांना फसविण्याचा प्रयत्न करतात. तेव्हां सरकारनें देशी मालास बळकट संरक्षण द्यावें असें येथील कारखानदारांचें मत दिसून येतें. परंतु सरकारला देशाचा व्यवहार करायचा आहे. आंतरराष्ट्रीय देवघेव ही जरूरीची असते. तेव्हां ही देवघेव करतांना सरकारी तज्ज्ञांकडून शक्य ती काळजी घेतली जाते. परदेशांतून थोडा फार माल येणारच. त्याच्यावर खूप जकात बसविली तर जास्त








संरक्षण मिळेल हें खरें. परंतु तो माल येणें बंद झालें तर दुसऱ्या देशाशीं आर्थिक व्यवहार करण्यास मार्ग उरणार नाहीं. तेव्हां गरजेसाठीं किंवा या आर्थिक कुचंबणेमुळें परदेशांतून थोडाफार माल येणारच. तेव्हां त्या येणाऱ्या मालाशीं स्पर्धा टिकवून स्वदेशी कारखानदारांनीं माल पुरविला, उत्तम प्रकारचा व खात्रीपूर्वक वस्तू पुरविल्या म्हणजे जनता आपोआप देशी माल घेऊं लागेल. परंतु देशी माल जर अगदींच कुचकामी असेल तर जनतेनें तरी तो माल कां पत्करावा ? आणि जो चांगला माल होत असेल तो देशी म्हणून विकत घेण्याचें जनतेचें कर्तव्य आहे हें विसरून चालणार नाहीं. फॅशन म्हणून उगीच परदेशी माल खरेदी करण्याचे प्रकार थांबविले पाहिजेत हेंहि तेवढेंच जरूरीचें आहे.

अशा प्रकारें भारतामध्यें विविध कारखाने सुरूं होत आहेत. सर्वांगीण प्रगतीच्या योजना आंखल्या जात आहेत आणि त्याप्रमाणें प्रत्यक्ष कामाला-हि सुरवात झाली आहे. लवकरच आपल्या देशांत सायकल, मोटार, रेल्वे-एंजीनें, विमानें, मोठीं जहाजें, रेडिओ इत्यादि चांगल्या व मुबलक प्रमाणांत तयार होतील. कारण या निर्मितीच्या कामास नुकतीच सुरवात झाली आहे. त्यामुळें औद्योगिक प्रगतीस कसून मदत करण्याचें सरकारी धोरण प्रशंसनीय आहे. त्या धोरणास कारखानदारांनीं चिकाटीनें व सचोटीनें नवीन कारखाने वाढवून, भांडवलदारांनीं उद्योग-धंद्याच्या कामासाठीं देशकल्याणाच्या दृष्टीनें पैसा गुंतवून, तंत्रज्ञांनीं मोठ्या तळमळीनें कार्याची जोपासना करून आणि जनतेनें स्वदेशीचा अभिमान बाळगून प्रत्यक्ष स्वदेशी माल खरेदी करून सहकार्य दिलें तर भारताची औद्योगिक प्रगति होण्यास उशीर लागणार नाहीं.

---

कोरगांवकर-संस्थेतर्फे भरलेल्या स्नेहसंमेलनाच्या निमित्तानें : श्री. दि. के बेडेकर

# एक उपक्रम आणि आशास्थान

गेल्या सातआठ वर्षांतील घडामोडींमुळें आपल्या देशांतील प्रत्येक माणसाच्या मनांत एक प्रकारचा दुहेरीपणा उत्पन्न झाला आहे. स्वातंत्र्य मिळालें व आतां आशेचें व कर्तृत्वाचें युग अवतरलें अशी उमेद मनांत दृढ व्हावी तोंच निराशेनें मन भारावण्यासारख्या घटना घडत गेल्या आहेत. उलट, निराशा आणि अगतिकता यांच्या अंधारात आशेचे किरणहि दिसत आहेत. दुहेरीपणाचें हेंच कारण आहे.

राजकीय पक्षसंघटना, सामाजिक संस्था व एकंदर समाजांतील शिक्षण, कला इत्यादि क्षेत्रें यांच्या अंतरंगांत पाहिलें तर हेंच दिसतें. निष्ठांचा आधार डळमळीत होत आहे व त्यामुळें बेदिलीचें व अस्थिरतेचें घातुक वातावरण सर्व क्षेत्रांमध्यें उत्पन्न झालें आहे. पक्षसंघटनांमध्यें खांदेपालट, परस्परांविषयीं अविश्वास व अंतर्गत विस्कळितपणा तीव्र झाला आहे. सत्ताधारी व सत्तारूढ पक्ष (काँग्रेस) यांच्यामध्यें आत्मविश्वास व जनतेवरील विश्वास यांचा अभाव दिसूं लागला असून त्याचाच परिणाम म्हणून लोकशाहीला विसंवादी असें वर्तन त्यांच्याकडून घडत आहे. उलट पक्षीं, सत्तेमध्यें हात गुंतलेले नसलेल्या संघटनांमध्येंहि सत्तेच्या राजकारणाचा प्रभाव अनिष्ट ठरत आहे.

या दुर्दैवी घटनांच्या चक्रांतच आपला देश सांपडलेला आहे असें मात्र नाहीं. कारण, सर्वच क्षेत्रांमध्यें ढांसळल्या निष्ठांबरोबरच एक नवी जाणीव व धडपड दिसत आहे. नव्या निष्ठा किंवा जुन्या निष्ठांबद्दल एक नवा निश्चय व विश्वास उत्पन्न होत आहे. आपलें परराष्ट्रीय धोरण आज आपल्या देशाला, आशियाखंडाला व पर्यायानें जगांतील सर्वच जनतेला उपकारक असें आहे. याबद्दलचा अभिमान आज सत्तारूढ पक्ष व विरोधी पक्ष या दोघांतहि दृढ होत आहे. त्याचबरोबर अंतर्गत प्रश्नांच्या बाबतींतहि कांहीं प्रसंगीं सर्व








लोकाभिमुख संस्थांची शक्ति एकत्रित होण्याचा सुयोग घडून येत आहे. महाराष्ट्रापुरतेंच पाहिलें तर 'दुष्काळ-निवारण' 'संयुक्त महाराष्ट्र' इत्यादि प्रश्नांवर मतभेद राखून पण ते गौण लेखून सर्वांनीं एकमुखी प्रयत्न करण्याची गरज आज पटली आहे व त्याप्रमाणें वागण्याचें धैर्य व समंजसपणा सर्व पक्षांनीं दाखविला आहे.

आपल्या समाजांत व पर्यायानें आपल्या राजकीय व इतर संस्थांत फार दोष आहेत हें खरें. पण आपला समाज जिवंत आहे. तोहि नुसता धुगधुगीनें जिवंत नसून त्याच्यांत विवेक, भावना व त्याग यांच्या प्रबळ प्रेरणा आहेत. म्हणूनच आजच्या दुहेरीपणाच्या अवस्थेंतहि आपल्या राजकीय संस्थांच्याकडून लोक-शाहीला पोषक अशा नव्या कर्तृत्वाची अपेक्षा आहे.

ह्याच अपेक्षेनें निरनिराळया ठिकाणीं 'संयुक्त' कार्यक्रमाचा प्रश्न राजकीय कार्यकर्त्यांकडून विचारांत घेतला जात आहे. असे प्रयत्न महाराष्ट्रांतहि झाले आहेत व त्यांचीं दोन उदाहरणें वर उल्लेखिलीं आहेत. महाराष्ट्रांतील सर्व शक्ती एकवटून समाजहित साधण्याचा प्रयत्न 'संयुक्त महाराष्ट्र'च्या क्षेत्रांतच नव्हे तर इतर अनेक लहानमोठ्या प्रश्नांच्या बाबतींत करतां येण्यासारखा आहे. अस्पृश्यता-निवारण व दारूच्या व्यसनापासून जनतेला मुक्त करणें हे विषय घ्या. यांत सरकारी कायदे आहेत पण त्यांची अंमलबजावणी होतांना एक तर सरकारी यंत्र दुबळें ठरत आहे किंवा उलट त्यांतच भ्रष्टाकार माजून मूळ ध्येयाला विघातक व समाजाच्या जीवनाला अपायकारक अशा भस्मा-सुरी शक्ती निर्माण होत आहेत. यांतून मार्ग कोणता ? तर सरकारी प्रयत्नांपलीकडे जाऊन सर्व राजकीय व सामाजिक संस्थांनींच हीं ध्येयें यशस्वी होण्यासाठीं एकवटून धडपड केली पाहिजे. या गोष्टीची जाणीवहि आज सर्वांना होत आहे.

या एकंदर परिस्थितींत कांहीं तरी नवा उपक्रम व्हावा व त्यांतून मराठी समाजाच्या अपेक्षेला मूर्त स्वरूप देणारी घटना घडावी हें साहजिकच आहे. या आशावादी दृष्टीनें व अपेक्षेनें कोल्हापूर येथें गेल्या मे ता. १६ व १७ रोजीं **श्री. कोरगांवकर धर्मादाय संस्थेतर्फे भरलेल्या स्नेहसंमेलनाकडे** पाहतां येईल, असें मला वाटतें.

'श्री. गोविंदराव कोरगांवकर धर्मादायसंस्था' ही कोल्हापूर येथें १६ मे १९४६ रोजीं स्थापन झाली. कोल्हापूरचे श्री. प्रभाकरपंत कोरगांवकर यांनीं आपल्या जवळच्या सुमारें पावणेतीन लाख रुपये किंमतीचा एक निधि देऊन आपल्या वडिलांच्या नांवानें ही संस्था स्थापन केली. या संस्थेच्या विश्वस्तमंडळाचे अध्यक्ष श्री. शंकरराव देव हे असून, विश्वस्तमंडळांत श्री. केदारनाथजी, श्री. अप्पासाहेब पटवर्धन, श्री. माधवरावजी बागल, श्री. प्रभाकरपंत कोरगांवकर इत्यादि सदस्य आहेत. या संस्थेच्या उद्दिष्टांत शिक्षण-संस्थांना मदत करणें, आपद्ग्रस्तांना साहाय्य देणें, ग्रामीण जीवनाची पुनर्घटना करणें, हरिजन वगैरे मागासलेल्या जमातींच्या उन्नतीसाठीं प्रयत्न करणें इत्यादि कार्यें अंतर्भूत आहेतच. यांशिवाय या संस्थेचें एक अत्यंत महत्त्वाचें कार्य "आपलें सर्व आयुष्य ज्यांनीं समाजसेवेला वाहिलेलें आहे व जे एका उदात्त जीवननिष्ठेनें आपलें जीवन कंठूं इच्छितात अशा समाजसेवकांचा एक भ्रातृसंघ निर्माण करणें" हें होय. या उद्दिष्टानुसार या संस्थेच्या विद्यमानें पण स्वायत्त असा एक 'सेवकसंघ' स्थापन झाला असून त्यांत उपरिनिर्दिष्ट विश्वस्तांशिवाय, आचार्य शं. द. जावडेकर, आचार्य स. ज. भागवत, श्री. एस् एम्. जोशी, श्री. अण्णा-साहेब सहस्रबुद्धे, श्री. वसंतराव नारगोळकर, श्री. आमटे, श्री. जे. पी. नाईक इत्यादि विविध क्षेत्रांतील कार्यकर्ते आहेत. या सेवकसंघाचें १९४७ पासून दरवर्षी एक स्नेहसंमेलन भरविण्यांत येत आलें आहे. या स्नेहसंमेलनाला सेवकसंघांतील कार्यकर्त्यांबरोबर इतरहि विविध विचारांच्या प्रमुख कार्यकर्त्यांना व विचारवंतांना निमंत्रण देण्याचा अत्यंत इष्ट असा प्रघात पहिल्यापासून पडला आहे. त्या परंपरेनुसार यंदाचेंहि स्नेहसंमेलन भरविण्यांत आलें होतें. या वेळीं कॉंग्रेस, सर्वोदयवादी, समाजवादी, शेतकरी–कामकरी पक्ष, नवमानवतावादी व कम्युनिस्ट अशा भिन्न मतांच्या व्यक्तींना या संमेलनासाठीं निमंत्रण दिलें होतें. व त्यांपैकीं कांहीं उपस्थित होते. यंदा निमंत्रितांपैकीं राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे एक कार्यकर्तेहि हजर होते. इतक्या भिन्न संप्रदायाच्या व्यक्तींचें हें संमेलन म्हणजे नुसत्या औपचारिक खेळीमेळीची व राजकीय चर्चेतील अपरिहार्य विसंवादा-












ला टाळण्याची बात्र असती तर त्यांत कोणालाच राम वाटला नसता. तें एक वनभोजन ठरलें असतें व त्यांत एक प्रकारचा वरपांगीपणाहि शिरला असता. पण सुदैवानें हें संमेलन अशा निष्फळतेपासून अलिप्त आहे याची जाणीव त्यांत भाग घेणाऱ्या सर्वांना झाली आहे.

या संमेलनाचा मुख्य हेतु नुसतें जमणें हा नसून, जनतेसंबंधींच्या प्रश्नांचा जिव्हाळयानें विचारविनिमय करणें व एकमेकांचा दृष्टिकोण स्पष्टपणें समजावून घेणें हा आहे. यंदाच्या संमेलनांतील चर्चाच घेतली तर त्यांत अनेक तात्त्विक व व्यावहारिक विषयावर मोकळेपणानें विचारविनिमय झाला. राज्यसंस्थेचें स्वरूप काय, पक्षसंघटना व लोकशाही यांचा परस्परसंबंध काय– या तात्त्विक प्रश्नावर पुष्कळ वाद व तोहि प्रखर मतभिन्नता स्पष्ट करणारा झाला. पण या वादाइतकाच दारूबंदी व शिक्षणाचें माध्यम किंवा बोधभाषा या प्रासंगिक व व्यावहारिक विषयावरील वादहि रंगला.

या वादांचें स्वरूप किंवा दिशा केवळ बौद्धिक जिज्ञासेची व निष्क्रियतेची नव्हती याचें प्रत्यंतर प्रत्येक वादांत येत गेलें. भूदानयज्ञाच्या यशापयशाबद्दलचा वाद या दृष्टीनें सर्वांत महत्त्वाचा होता. इतर सर्व प्रश्नांपेक्षां महाराष्ट्रांतील जमीनीचा म्हणजे शेतकऱ्यांचा व शेतीव्यवसायाचा प्रश्न हा मूलभूत राजकीय व सामाजिक प्रश्न आहे, ही गोष्ट सर्वांनाच मान्य असल्यामुळें या यक्षप्रश्नाचें बिनचूक उत्तर आपण सर्वांनीं मिळून दिलें तर मराठी जीवनाचा व राजकारणाचा कायापालट होऊं शकेल ही सुप्त आशा सर्वांच्या मनांत होतीच. साहजिकच भूदानयज्ञासंबंधींच्या चर्चेला व्यापक अर्थानें शेतकरी-प्रश्नाच्या विचाराचें वळण लागलें. यांतूनच श्री. शंकरराव देव यांनीं एक दूरगामी महत्त्वाची सूचना सर्वांपुढें मांडली कीं शेतकरी-प्रश्नावर महाराष्ट्रांतील सर्व मतांच्या लोकांनीं व संघटनांनीं एकत्र येऊन चर्चा करणें व एक सर्वसंमत विचार व कार्यक्रम तयार करण्याचा प्रयत्न करणें शक्य आहे. या सूचनेचें सर्वांनीं स्वागत केलें. अशा संयुक्त प्रयत्नांनीं या मूलभूत प्रश्नाचें उत्तर देण्याचा महाराष्ट्रांत जर प्रयत्न झाला तर केवढी मोठी गोष्ट होईल ! तसेंच मद्यपानबंदीबाबत असें ठरविण्यांत आलें कीं एक सर्वपक्षसंमत असा मसुदा तयार करून त्यावर महाराष्ट्रांतील पक्षीय व इतर प्रमुख व्यक्तींच्या सह्या घेऊन तो जाहीर करावा. या प्रयत्नांत अनेक अडचणी येतील व त्याचें यशापयश हेंहि सर्वांच्या सद्‌भावना व एकत्रित कार्यावरील निष्ठा यावरच ठरणार आहे हें खरें. पण यशापयश कांहींहि येवो. हा प्रयत्न हें एक मोठें आशास्थान आहे, ही गोष्ट विश्वासानें म्हणतां येईल.

कोल्हापूरच्या या स्नेहसंमेलनाच्या उपक्रमाच्या मागें महाराष्ट्रांतील जनतेच्या सेवेची तळमळ व मतमतांतरांना सहिष्णुतेनें समजावून घेण्याची इच्छा आहे व महाराष्ट्रांतील सर्व कार्यकर्त्यांच्या मनांतील त्यागबुद्धि व नवसमाजनिर्मितीचा ध्येयवाद यांना सामावून घेण्याची धडपड आहे. म्हणूनच या उपक्रमाला एक आशास्थान मानणें योग्य होईल. आणि यांतून जर आपल्या राजकीय जीवनांतील व जनतेंतील कार्यशक्ति निकोपपणानें एकवटली तर फार मोठें कार्य होऊं शकेल.

---

**कॅनडाचे गव्हर्नर-जनरल यांचे विचार : श्री. अ. रा. केळकर**

# विद्यापीठाचें सामाजिक जीवनांत स्थान

आज शैक्षणिक पुनर्घटनेचा ऊहापोह जाणत्यांमध्यें चाललेला आहे, आणि सर्वमान्य नागरिकहि त्याचा कानोसा घेत आहे. या संदर्भांत कॅनडाचे गव्हर्नर-जनरल व्हिन्सेंट मॅसि यांनीं पश्चिम ऑंटेरिओ विद्यापीठाच्या गतवर्षीं झालेल्या पंचाहत्तराव्या वाढदिवसाच्या प्रसंगीं केलेल्या भाषणांतील पुढें दिलेले कांहीं उतारे निःसंशय विचारार्ह वाटावेत. अर्थात् भाषणाची व्याप्ति साहजिकच उच्च शिक्षणापुरती आहे व पार्श्वभूमीहि कॅनेडिअन आहे. सांस्कृतिक दृष्ट्या एका बाजूला संयुक्त संस्थानांचा शेजार आणि








दुसरीकडे इंग्लंड, फ्रान्स यांकडे ओढा अशी कॅनडाची परिस्थिति आहे, तिचे पडसाद या भाषणांतून जाणवतात. तरीहि आपल्या कडील विश्वविद्यालयीन जगांत काय चालू आहे आणि काय येऊं पहात आहे याची आठवण वारंवार होईल. सुरवातीचे कांहीं उतारे मूळ संदर्भ ध्यानांत येण्यासाठीं मुद्दाम दिले आहेत:

"...जिथें अजून पुरती वस्तीहि झालेली नाहीं अशा टोरांटो शहरापासून बाजूला पडलेल्या भागाला स्वतंत्र आणि सुसज्ज असें विद्यापीठ असावें अशी मागणी पंचाहत्तर वर्षांपूर्वी ज्यांनीं केली त्यांच्या धाडसाचें कौतुक केलें पाहिजे. या मागणीमागें ज्याप्रमाणें आपल्या पाडसांना कांहींहि कमी पडतां कामा नये हा मिशनरी माणसाचा वत्सल निर्धार आहे, त्याप्रमाणें केंद्रापासून आपण स्वतंत्र असावें ही व्यावहारिक दृष्टीहि आहे.

" विद्यापीठ उभें राहिले खरें, पण तें सुस्थिर करतांना अनेक अडचणींना तोंड द्यावें लागलें. धाडसाबरोबर चिकाटीचें बळ यावेळेस जरूर होतें, आणि तें उपलब्ध झालेंहि.

" मात्र अशा आनंदाच्या वेळीं सुद्धां आपण किती मोठी मजल मारली याबद्दल कृतकृत्य व्हावें आणि सिंहावलोकन करावें अशी परिस्थिति आज राहिलेली नाहीं. आपल्यासमोर कुठल्या अडचणी आहेत, त्यांना तोंड कसें द्यावयाचें आहे याकडेच आपणांस लक्ष द्यावें लागत आहे.

" अलीकडे विद्यापीठाच्या कार्याचा पसारा जसजसा वाढत चालला आहे, तसतसें त्यांना आर्थिक बळ अपुरें पडूं लागलें आहे. साहजिकच कांहीं प्रश्नांचा वारंवार आणि निकडीनें विचार करण्याची वेळ आली आहे. पहिला प्रश्न : जर सर्वच होत नसेल तर आधीं कोणतें आणि नंतर कोणतें ? दुसरा : जर ही निवड अशक्य असेल, तर आणखी पैसा कोठून आणावा ? आणि या दोन प्रश्नांतूनच तिसरा मूलभूत पण कांहींसा दुर्लक्षित मुद्दा निघतो तो हा कीं 'युनिव्हर्सिटी' म्हणजेच काय आणि ती कशाकरितां ? प्रगत समाजांत तिचें नेमकें स्थान काय ?

" या प्रश्नावर यापूर्वी झालेला विचार लक्षांत घेऊन प्रथमच आपल्याला असें म्हणतां येईल कीं आजची 'युनिव्हर्सिटी' एक मोठेंच कार्य आपल्या अंगावर घेऊं पहात आहे. तें म्हणजे आपल्या संस्कृतीचा जो कांहीं वारसा आपल्याला मिळालेला आहे त्याचें जतन करणें; कला, साहित्य, विज्ञान, तत्त्वज्ञान, धर्म या सर्व क्षेत्रांत जें जें कांहीं संचित आहे त्याची साक्ष आणि आठवण ठेवणें; एवढेंच नव्हे तर नव्या पिढीला तें लोण पोचवणें. आपल्यापैकीं प्रत्येकाला हें पाथेय यथाशक्य उपलब्ध करण्यासाठीं आपण झटलें पाहिजे.

" विद्यापीठाचा गाभाच असा जो लहानथोर विद्यार्थिवर्ग त्यावर अनेक जबाबदाऱ्या यामुळें पडतात. संपूर्ण ज्ञानविस्ताराचा पाठपुरावा करायचा तर दृष्टि त्याच्या चालू मर्यादांपलीकडे गेलीच पाहिजे. असलेलें ज्ञान मिळविणें, त्यांत नवीन भर टाकणें आणि संपूर्ण ज्ञानाची पुन्हा नवी रचना करणें ही एकच प्रक्रिया आहे...

" ज्ञानाच्या एकसंधपणाची सतत जाणीव ठेवणें, विविध ज्ञानशाखांमध्यें विस्कळितपणा येऊं न देणें, सर्व ज्ञानसंपादनाला एक अवधान, एक अधिष्ठान मिळवून देणें हें कार्य 'युनिव्हर्सिटी'चें नाहीं तर दुसऱ्या कुणाचें ? हें कार्य युनिव्हर्सिटीकडून जर व्हावयाचें असेल तर ( मॅथ्यू आर्नोल्डच्या शब्दांत ) ( " to see life steadily and see it whole " ) जीवनाकडे सतत आणि समग्रतेनें बघण्याची दृष्टि बाणविली पाहिजे....

"आणखी थोडें पुढें जाऊन पाहिलें तर दिसून येईल कीं, याबरोबरच पूर्वी मिळविलेल्या ज्ञानाचा आतांच्या परिस्थितीशीं संबंध उलगडून दाखविल्याखेरीज हें कार्य पुरें होऊंच शकत नाहीं. फ्रूड ( Froude ) म्हणतो त्याप्रमाणें, 'जेव्हां माणूस आपल्या ज्ञानाचा उपयोग करूं शकतो, तेव्हांच तें ज्ञान खरेंखुरें, जिवंत, वर्धिष्णु ठरतें, त्याचा व्यावहारिक क्षमतेशीं बेमालुम सांधा जुळतो. एरव्हीं ती मेंदूंत सांचलेली धूळ होय, दगडावर धरलेल्या पावसाच्या थेंबाइतकेंच तें क्षणभंगुर !

" विद्यापीठानें जें सृजनकार्य करावयाचें आहे त्याचें स्वरूप या पार्श्वभूमीवर सहज स्पष्ट होईल. जे जन्मतात प्रतिभावंत आहेत व ज्यांना जीवनाचा एक वेगळाच प्रत्यय आला, आहे अशांनींच बहुधा नवनिर्मितिकार्याची मूहूर्तमेढ रोंवलेली आपल्याला इतिहासांत



अनुक्रमणिका






दिसते. त्याबरोबर हेंहि आपल्या लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सेंट पॉल, फ्रॅन्सिस ऑव्ह असीसी, ल्यूथर, वेस्ली यांसारख्या धर्मक्षेत्रांतील बंडखोरांनींसुद्धां त्यावेळच्या सर्वमान्य अशा ज्ञानसंपदेचें आलोडन केलेलें होतें.... किंबहुना असेंहि म्हणता येईल कीं, एखादें आदर्श विद्यापीठ जरी घेतलें तरी नवनिर्मितीची प्रवृत्ति आणि विद्यापीठाचें कांहींसें बंदिस्त वातावरण यांमध्यें विरोध येणार, आणि अशा विरोधांतून उत्पन्न होणाऱ्या बंडखोरीला उचित निमित्त पुरविणें हा सुद्धां विद्यापीठाचा एक उपयोग होऊ शकेल. शिस्त लावतां लावतां विद्यापीठाकडून ज्ञानपोषणाचेंहि कार्य होऊं शकतें.

" माझ्यासारख्या जुन्या पिढीच्या लोकांना आपलें असें वाटत असतें कीं अलीकडे काम वांचविण्याच्या क्लृप्त्यां-( short-cuts )वर फार भर दिला जातो. हल्लीचीं कॉलेज-विद्यार्थ्यांकरितां लिहिलेलीं पाठ्यपुस्तकें पहा ना. नाहीं, म्हणजे बाइंडिंग छान असतें, चित्रें -- आकृत्या भरपूर असतात, पोटमथळे, जाडा टाईप, बारीक टाईप यांची गर्दी उडालेली असते ! पण असेंहि मी ऐकतों कीं, किंमत चढी, लेखनशैली यथातथा, मजकुराच्या दृष्टीनें दर्जा खालावलेला, कित्येक वेळां माहिती चुकीची-अशींच तीं बहुशः असतात. एवढ्यानें पुरें झालें नाहीं म्हणूनच कीं काय उतारे, गोषवारे, टिप्पणी, टीका अगदीं अव्ययावत् ! यांच्यावर विद्यार्थ्यांची बोळवण केली जाते. यामुळें मूळ पुस्तक, लेखक, काव्य अनेकदां बाजूलाच पडतें ! या सर्व परिस्थितींत होतें काय, कीं मूळ वस्तू-(fact)बद्दल अज्ञान वा अर्धेकच्चे समज राहून जातात, बिनचूक, रेखीव, कांटेकोर संशोधनाची अवहेलना होते. स्वतःच्या पायांवर उभें राहून टीका करण्याची धमक उत्पन्न होत नाहीं, अनिश्चित अधांतरीं विधानें (vague abstractions) करण्याची हौस बळावते आणि सरते शेवटीं, मिळविलेलें ज्ञान आणि प्रत्यक्ष अनुभव यांची सांगड घालणें जमत नाहीं.

" घाईघाईनें बराच मोठा अभ्यासक्रम उरकला जाणें वेगळें आणि स्वतःच्या हिमतीवर थोडें का होईना ज्ञान मिळविणें वेगळें. पहिल्या प्रकारांतील विद्यार्थी दुसऱ्या प्रकारांतील आनंदाला ठेंचा खात वळण लागून जो आनंद, जी ईर्ष्या उत्पन्न होते त्यांना मुकतो...

" वाचन आणि लेखन या दोन कला गमावून बसण्याची पाळी आज आपणावर आली आहे. वाचनासारखें सुलभ आणि पोषक असें बुद्धीला दुसरें खाद्य नाहीं.[१] कानांनीं ऐकणें, डोळ्यांनीं बघणें, आणि प्रयोगशाळेंत हातानें घटविणें यावर आपण अलीकडे वाजवीपेक्षां अधिक भर देतो. एक सुप्रसिद्ध कॅनेडियन प्राध्यापक या संबंधांत आपल्या विद्यार्थ्यांना म्हणत : ' जर तुम्हाला कांहीं नवी कल्पना आत्मसात् करायची असेल, सुचायची असेल, तर दूर एकटे फिरायला जा. प्रयोगशाळेंत बसून हें कधीं होत नसतें.

"अभ्यास एखाद्या ज्ञानशाखेपुरताच मर्यादित खूप आधींपासूनच करण्याकडे आधुनिक विद्यापीठें प्रोत्साहन देतात. अर्थात् हें आपलें करणें कांहीं बरोबर नाहीं असें मनांत तीं घोकीतच असतात ! ज्या ज्ञानैक्याबद्दल, एकसंध तत्त्वरचनेबद्दल मी मागें सांगितलें त्याचें मग काय असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. समाजस्थित मानवाचें महत्त्व आज आपण मान्य करतों. राजनीतिशास्त्र आणि समाजशास्त्र यांतील संशोधनावर भर देतो. यांत वावगें कांहींच नाहीं. पण आपल्याला व्यक्तिरूप मानवाचें साहित्य, इतिहास यांतून जें दर्शन होतें, त्याकडे आपण पाठ फिरवीत आहोंत. भिन्नभिन्न परिस्थितीमध्यें एखादा मनुष्य कसा वागतो, त्याच्या सुष्टदुष्ट प्रवृत्ती कशा प्रकट होतात यांतून मानवाचें जें खोल ज्ञान आपणाला व्हावयाचें त्याला आपण पारखे होत आहोंत. जीविताच्या नीरव अगम्यतेचा, जीविताच्या गूढतेचा साक्षात्कार, मानवाच्या आध्यात्मिक अंगाची ओळख आपल्याला अन्य कुठें होणार ? मानव अज्ञात आणि अज्ञेय यांच्यासमोर बेडरपणानें जर कुठें उभा ठाकत असेल,

१ या संदर्भात बी. ईफर एव्हन्स या ब्रिटिश शिक्षणतज्ज्ञाचें मत देण्याचा मोह आवरत नाहीं : "मुद्रण-कलेवर आपलें सांस्कृतिक जीवन आज अवलंबून आहे. अलीकडे आपण रेडिओ, बोलपट यांवर भिस्त ठेवीत आहोंत खरें; प्रचार, शिक्षणाचा प्रसार, आणि मनोरंजन यासाठीं त्यांचा उपयोगहि आहे. पण डोळ्यांनीं वाचण्यानें जें साधतें तें कानानें ऐकण्यानें कधींहि होणार नाहीं. भरीव व्यासंग आणि विचारांची देवघेव यांसाठीं वाचनच पाहिजे. वाचनांतच सूक्ष्म मनन करतां येतें. "












तर तो साहित्यांत. मग तें साहित्य ऐहिक असो वा धार्मिक असो.

" संशोधनाचें म्हणाल, तर विद्यार्थी अर्धाकच्चा असतांनाच संशोधनास सुरवात करतो. आणि पुढें प्राध्यापक झाल्यावरसुद्धां हें राहिलेलें वाचन पुरें केलें जातेंच असें नाहीं. आधीं वेळ मिळण्याची मारामार; आणि मिळालाच तरी या वाचनाला विचारतो कोण ?

" प्रदीर्घ व्यासंग आणि परिपक्व चिंतन याबद्दलची तुच्छता किती आहे, याचें घडलेलें एक उदाहरण सांगतों. एका विद्यापीठांत शिक्षक जें लेखन करतात त्याचे दोन वर्ग पडतातः 'संशोधनात्मक निबंध' आणि 'मासिकांतील लेख '. आतां उत्तम दर्जाच्या लेखांचाहि उपयोग आहे. मानवी स्वभाव आणि अनुभवाचा विस्तार यांचा जो अभ्यास अभ्यासकानें करावयाचा, तो अशा मासिकांतील लेखांतूनच प्रचलित समस्या सोडवितांना कारणीं लावावयाचा असतो. पण यासाठीं खुर्चीवरून उतरावें लागतें ना ! कुठें ' निबंधां'ची योग्यता, कुठें ' लेखां'ची ? ... एक तरुण अध्यापक होता. संसार वाढता होता. करतो काय ? मासिकांतील ' लेख ' सोडून 'निबंध' लिहूं लागला. शिवाय तें सोपेंहि होतें! सांगायचें कारण त्याला बढती मिळत नव्हती ती मिळाली. असा प्रकार नेहमींच घडत असेल कां ? घडत नसो एवढीच सदिच्छा.

"विद्यापीठांत नेहमीं दोन प्रकारचे लोक असतात : ' कसें ' या प्रश्नांत गुरफटलेले जात्या तंत्रकुशल आणि ' कां ' याचा शोध घेण्यांत गढणारे सर्जनशील तत्त्व-चिंतक. जर तंत्रज्ञांच्या गर्दीत विचारवंत असेच उपेक्षिले गेले, तर पुढेमागें आपला सर्व बौद्धिक आणि आध्यात्मिक वारसा असून नसल्यासारखा होण्यास वेळ लागणार नाहीं !

"आतां यावर असें कोणी म्हणतील कीं, 'आराम-खुर्चीत बसणाऱ्या पारंपरिक प्रतिष्ठेच्या कल्पनांना कव-टाळणाऱ्या बुड्या विद्वानांच्या असल्या कुरकुरीकडे लक्ष द्यायला इथें वेळ कुणाला आहे ? विज्ञानानें एवढें आमूलाग्र परिवर्तन केलेलें असतांना मुळापर्यंत जाण्याची उठाठेव कशाला ? जर कोणतीहि गोष्ट कृत्रिम बनवतां येते तर नैसर्गिक वाढ कशी होते याबद्दल उगीच काळजी कशाला ?

" याला उत्तर एवढेंच कीं, वैज्ञानिक परिवर्तन आमूलाग्र नाहीं. आपला पिंड परंपरे-(tradition) मध्यें पोसतो. आपण जें कांहीं करतों त्यामागें पुष्कळदां आपण ज्या गोष्टी गृहीत धरलेल्या असतात त्यांचा आपल्याला पत्ताहि नसतो ! आधुनिक मानसशास्त्रांत मानवी मनाला हिमनगाची उपमा देतातच. शेक्स-पिअरनेंहि म्हटलेंच आहे. " Whst's past is prologue." ( ' The Tempest ' )... गंभीर संक्रमणावस्थेला ( crisis ) तर हें विशेषच लागूं आहे. आणि ज्या भूतकाळाचा आपल्यावर परिणाम व्हायचा, तो आपल्या न कळत निर्वेधपणें होऊं देण्या-पेक्षां आपण त्याबद्दल डोळसपणें जागरूक असणें श्रेयस्कर नाहीं काय ?

" सध्याच्या पिढींत जर उणीव असेल, तर तिला भूमीमध्यें खोल गेलेलीं मुळें नाहींत. जर कोणी कांहीं गंभीर विचार मांडूं लागेल तर त्याला उत्तर काय मिळतें ? ' असेल सर्व तसें, मग त्याचं पुढं काय ? ' खरंच, विचारण्यासारखा हा प्रश्न आहे की, ' पुढें ? ( So what ?)' दुर्दैवाची गोष्ट (tragedy) अशी आहे, कीं, प्रश्न विचारण्याअगोदरच त्याला उत्तर मिळणें अशक्य आहे असें गृहीत धरलेलें असतें. अर्थात् या कोंडींत आजची नवी पिढी सांपडलेली नाहीं अशीं कांहीं सुचिन्हेंहि दिसत आहेत. वरवरच्या बेफिकिरीखालीं आजच्या मुलांना, निःशब्द का होईना, अशी मनोमन जाणीव झालेली आहे कीं, या प्रश्नाला उत्तर आहे आणि तें शोधतांना मागच्या पिढीकडन मदत मिळावी अशी त्यांची अपेक्षा आहे. माझ्या मतें आपल्या विद्यापीठाचें आद्य कर्तव्य हेंच कीं त्यांच्या अडचणींची आपुलकीनें दखल घेणें, त्यांना अधिक व्यापक ज्ञान देणें आणि अधिक काटेकोर कार्यनिष्ठा ( discipline ) बाणविणें. ' पुढें काय करा-यचें ? ' या प्रश्नाला उत्तर आहे, पण तें चटकन् मिळणार नाहीं. मार्ग मिळेल पण तो सोपा नाहीं. झटपट रंगारीपणा आणि आखीव तंत्र यांना तो गवसणार नाहीं. जर विद्यापीठें याप्रमाणें नव्या पिढीला मूलस्रोतांकडे नेतील, तर ती पिढी विशाल संस्कृतीची अधिकारी होईल. — संस्कृतीचे कालशः खंड पडत नाहींत. संस्कृति म्हणजे भूतकाळांतील मृत, वर्तमान-काळांतील जिवंत आणि भविष्यकाळांतील आगामी यांमधील दळणवळण घडवून आणणारें साधन होय. ( civilization, ' a thing not divided in time but a communication between the dead, the living and those who shall live ). '